# “डोलकाठी”

कोकणात समुद्राच्या सान्निध्यात, भरती-आहोटी पहात आणि पुळणीत खेळण्यात मी बालपण घालंवलंय. सागराच्या उत्तुंग लाटात स्नान करून सूर्याला अर्घ्य देणाऱ्या सिंधुदुर्गाकडे मी नेहमी उत्सुकतेनं पाहिलंय. चिमुकल्या मनात शिवाजी महाराजाचं कल्पनाचित्र रंगवीत शब्दाला शब्द जोडून मी पाच ओळींची कविताही केली होती. त्या सिंधुदुर्गानंच मला इतिहासाचं दालन उघडून दिलं.

कान्होजी आंग्रे हा समुद्राच्या अंगाखांद्यावर खेळणारा, उनाडक्या करण्यात आनंद मानणारा अगदी सामान्य मुलगा. गुरुजींनी तर “ठोंब्या” म्हणून हेटाळणीही केली. परंतु एका क्षणानं दिलेलं आव्हान त्यानं स्वीकारलं. तो धैर्यानं पुढं सरकला. ब्रह्मेंद्रस्वामींनी दाखवलेल्या मार्गानं तो चालू लागला. अत्यंत प्रामाणिकपणानं काम करून त्यानं जुल्मी सिद्दीला, लाचखाऊ अप्रामाणिक किल्लेदाराला मातीत मिळवलं. तो खऱ्या अर्थानं दर्याजा राजा झाला. आकाशाकडे झेपावणारा समुद्रही त्याच्या पराक्रमानं थक्क झाला. त्या सागरानं त्याला कौतुकानं मस्तकावर घेतलं. तोच कान्होजी आंग्रे “दर्याचा राजा”च्या स्वरूपात मी वाचकांपुढं ठेवीत आहे. पुस्तक आवडल्याची कबूली देणार ना?

या पुस्तकासाठी अनेक संदर्भ शोधण्यात मला बराच वेळ लागला. त्यासाठी मला अनेकांनी सहकार्य दिलं. त्यात श्री. श्रीराम मोघे यांचं नाव प्रामुख्यानं घ्यावं लागेल. या सर्वांचे आभार मानणं अतिशय सुखावह आहे. त्याशिवाय चित्रकार प्रकाशक आणि मुद्रक याचं ऋण कबूल केल्याशिवाय मी एकही पाऊल पुढं टाकू इच्छित नाही.

- नयनतारा देसाई
1-1-1983

# 1

पूर्वेला तांबडं फुटलं. हळूहळू ती लालसर गुलाबी कोमल किरणं खाली उतरली. सुवर्णदुर्गाच्या चारही बाजूला असलेल्या पाण्यातील तरंगाशी ती मनमुराद खेळू लागली. नेहमी गजबजणाऱ्या सुवर्ण दुर्गातल्या आंब्याच्या झाडावर चढून पाण्यात उडी मारणारा ‘कान्हू’ न दिसल्यामुळं ती किरणं फार बेचैन झाली. त्यांना काही सुचेना, खेळण्यात त्यांचं मन रमेना. मग ती किरणं ‘कान्हू’ला शोधण्यासाठी सुवर्णदुर्गाकडे निघाली. द्वारावरचा पहारेकरी अडवून ठेवील, या भयानं त्यांनी रंग बदलला. ती क्षणार्धात चक्क सोनेरी बनली. पहारेकऱ्याजवळ येऊन त्यांनी गोड स्वरात विचारलं.

“मामा, आज दुर्गात इतकी शांतता कशी?”

“तुम्हाला काय करायची नसती उठाठेव? चालू लागा.”

“मामा रागवू नका. आमचा “कान्हू” दिसला नाही, म्हणून आलोय त्याला शोधायला!”

आपल्या छोट्या मालकाचं नाव त्यांच्या तोंडून येताच गुणाजी घाबरला. त्याच्या गलमिशा थरथरल्या.

“थोरले मालक तुकोजी लय बीमार हाईत, मंग कान्हू कसे येत्याल?”

“अस्सं होय! आम्हीच जातो त्याच्यापाशी.”

गुणाजी दंडुका घेऊन द्वारावर उभा राहिला. किरणं आतल्या भागाकडे वळली. किल्ल्यातले नोकरचाकर स्तब्ध उभे होते. त्यांच्या चेहऱ्यावर औदासिन्य होतं. बिचारी किरणं तुकोजीच्या खोलीत जाण्यासाठी खोळंबून उभी राहिली. परंतु खिडक्या बंद होत्या. दरवाजासुद्धा झाकलेला होता. इकडेतिकडे पहात किरणं तिथंच रेंगाळली. हळूहळू दरवाजा कुसुवात कुरकुरला. वैद्य बाहेर आले, आणि आतून बिंबाबाईचा हंबरडा ऐकू आला. त्यात कान्हू, दत्ताजी सयाजीचे आवाजही मिसळले होते. बिचारी किरणं संकोचानं त्या खोलीत प्रवेशली. कान्हूचे पिता तुकोजी आंग्रे मृत्यू पावल्यामुळं त्या खोलीत दु:खाबरेबर कारुण्यही होतं. थोड्याच वेळात दुर्गातली बरीच मंडळी येऊन दु:ख प्रगट करू लागली. शवयात्रेची तयारी सुरू झाली.

*

* *

पतिनिधनामुळे बिंबाबाई जबरदस्त दु:खात चूर झाली. तिचं घरातलं लक्ष उडालं. कान्हूकडेही तिचं दुर्लक्ष झालं. त्यामुळं दिवसभर खेळायला तो मोकळा झाला. बरोबरीच्या मुलांना जमवून तो उनाडक्या करू लागला. किल्ल्याच्या तटावर चढून समुद्रात जास्तीत जास्त उड्या मारण्याची पैज लावणं हा त्याचा नित्यक्रम झाला.

वैशाख सुरू झाला. उन्हं रणरणू लागली. दुपार तर घामानं भिजू लागली. समुद्राचं पाणी गरम झालं. तरीही लाटा उफाळू लागल्या. जणू त्या पोहण्यासाठी “कान्हू”ला आमंत्रण करीत होत्या. तो आपल्या सवंगड्यासह पाण्यात उतरला. गुणाजीचा हरी अगदीच नवखा होता. मोठ्ठी

लाट आल्याबरोबर तो घाबरला.
''कान्हू मी मेलो - मरतोय रेऽऽ''
''भित्रट हाईस, चल येऽऽ'' कान्हूनं त्याला हात दिला.
त्याला किनाऱ्यावर पुळणीत आणलं. परंतु त्याच्या नाकातोंडात पाणी गेल्यामुळे शुद्ध हरपली होती. कान्हू आणि दत्ता त्याच्या पोटातलं पाणी काढण्याच्या प्रयत्नात असतानाच दुसरी पोरं गुणाजीला घेऊन आली. थोड्या वेळानं हरी सावध झाला. गुणाजी त्याला घेऊन घरी गेला. त्यानं ही हकीकत दुसऱ्याकडून बिंबाबाईच्या कानी घातली. मुलानं शिकावं, महाराजांच्या नोकरीत शिरावं, अशी बिंबाबाईची खूप इच्छा होती. मुलाच्या दांडगाईची ही तक्रार ऐकून ती खूप संतापली. रागच्या भरात तिनं एकुलत्या एक मुलास चांगलं बदडलं. बिचारा ''कान्हू'' न जेवताच झोपला. त्या मातेनं मात्र संपूर्ण रात्र तळमळत घालवली.
पहाट झाली, कोंबडा आरवताच उठून तिनं एक टोपली भरली. कान्हूला उठवलं. त्याला थोडंसं खायला घालून आपल्या बरोबर घेतलं. सकाळी-सकाळीच ती पुत्रासह हर्णे गावात आली. त्याच्या बकोटीला धरून तिनं त्याला जोशीबुवांच्या घरात आणलं. नारळ, सुपाऱ्याची टोपली ठेवून तिनं पदरानं घाम पुसला.
''भटजी, ह्या पोराला शाणं करायला तुमच्या हिथं ठेवायचं हाय.''
''आलो, आलो.'' त्यांनी समोर दरवाज्यात पाहिलं.
काळ्या रंगाचा आडदांड मुलगा समोर उभा होता. त्याचे डोळे बटबटीत होते. मस्तकावरचे केस राठ होते. त्याच्या चेहऱ्यावर बेपर्वाई दिसत होती. तो मुलगा त्यांना बिलकुल आवडला नाही. तो शिकणार नसल्याचंही त्यांनी जाणलं.
''काय म्हणतीऽऽस?''
''अवोऽऽ, हे पोरगं नवसाचं म्हणून लाड केले. ते माज्याच डोईवर बसलं. ह्ये थोडं शाणं झालं तर सोर्णदुर्गाची किल्लेदारी भेटंल. पर हे लई नाठाळ. तुमी ह्याला ताळ्यावर आणा. तुमचे उपकार मी ठेवणार न्हाई.''
''ह्या पोरासाठी कुणाला नवस बोलली होतीस?'' जोशीबुवांनी मिस्किलपणानं विचारलं.
''दोन्ही भावांना पोर न्हाई म्हणून मी कानिफनाथाला नवस बोलले. काय चमत्कार बगा भटजी, दोघांनाही पोरगेच झाले. कानिफनाथानं दिलं होतं म्हणून हेच नाव ''कान्होबा'' ठेवलं.
''ह्याला मी शिकवलं... तर तू काय देणार?''
''भटजी, मी रांडमुंड बायको, पैका कसा देनार? नारळ सुपारी आणि भात घालीन.''
जोशीबुवांनी मनात पूर्ण हिशेब केला. त्या मुलावरून पुन्हा एकवार नजर फिरविली.
''बरंऽऽ'' जोशीबुवांनी जानवं सावरीत पोटावरून घसरणारं धोतर वर घेऊन कनवट ओढली.
कान्होबाला जोशीबुवांच्या घरी सोडून बिंबाबाई निघून गेली. अंगणात उभं राहून झपाझप जाणाऱ्या आईकडे पहात असतानाच ''कान्होबा''च्या पाठीला प्रेमळ स्पर्श झाला. त्यानं मागं वळून पाहिलं. तो जोशीबुवांचा श्रीकृष्ण होता. त्याच दिवशी तो त्याचा मित्र बनला. दोघांची गट्टी जमली, तो दिवस त्यांनी असाच घालवला.
दुसरा दिवस उगवला. जोशीबुवांनी दोघांनाही स्नानासाठी तळ्यावर पाठवलं. आंघोळ करून ती दोन्ही मुलं आम्रवृक्षावर दगड मारण्यात गुंग झाली. उन्हं बरीच वर आल्यावर ते दोघेही घरी परतले. जोशीबुवा देवपूजा आटोपून निर्माल्य घालण्यासाठी तुळशीकडे जात होते. अपेक्षेपेक्षा उशिरा आलेल्या मुलांचा त्यांना फार राग आला, शेवग्याच्या ओल्या काठीनं फोडून काढण्याची त्यांना तीव्र इच्छा झाली, परंतु त्यांनी स्वत:ला सावरलं.
''चला रे आता, धुळाक्षरं गिरवायला.''

आज्ञाधारक मुलांसारखे दोघंही ओटीवर जाऊन बसले. जोशीबुवांनी पाटीवर मुळाक्षरं लिहून दिली. त्यांच्याकडून दोनतीन वेळा लिहून-म्हणून घेतल्यावर ते घरात येऊन पत्रावळी लावायला बसले.

मुलांचं अक्षराकडे लक्षच नव्हतं. जोशीबुवा आत जाताच ते रेघोट्या ओढू लागले.

दिवस पुढं पळत गेले, परंतु प्रयत्न करूनही ती मुलं शिकत नसल्याचं पाहून जोशीबुवा रागानं लाल झाले. मग मात्रं त्यांनी या दोन्ही पोरांना एक दिवस सडकून काढलं.

"पोरांनो, तुम्ही दोघंही आजपासून गुराखी! गुरांना घेऊन रानात जा." ... त्या दोघांना तेच हवं होतं!

हवं ते मिळाल्याने दोघंही मनातून खूप आनंदले. परंतु चेहरे निर्विकार ठेवून ते खाली पाहू लागले. रात्री हितगुज करीत दोघंही स्वस्थ झोपले. परंतु गाढ निद्रेतही कान्होबाला उफाळणारा सागर दिसत होता. किनाऱ्याकडे धावणाऱ्या लाटांच्या गर्जना त्याला ऐकू येत होत्या. पहाट होताच कान्होबाला जाग आली. इतक्यात त्याला कोंबड्याची बांग ऐकू अली.

"क्रिश्ना ऊठ, कोंबडा साद घालतोय. ढोरं रानात न्हेवची न!"

"हो, उठलोच." श्रीकृष्णानं आळोखे-पिळोखे देत जांभई दिली.

दोघंही अतिशय उत्साहानं धावत-पळत तळ्यावर गेले. पाण्यात उतरून ते मनसोक्त डुंबले. घरी येऊन त्यांनी नेमून दिलेली कामं पुरी केली. हातात काठ्या घेऊन ते अंगणात आले, तेव्हा भिणभिणलं होतं. जोशीबुवांची आणि साधले भटाची गुरं घेऊन ते मजेत निघाले. दिसेल त्या झाडावर दगड मारीत ते पुढं जाऊ लागले.

"ए कान्होबा, आजपासून खूप खूप खेळायचं बरं का. ढोरं सोडून आज होडगं घेऊन जाऊ या."

"तुला वल्हं मारता येतं?"

"नाही रे बाबाऽऽ, तू शिकविशील?"

"होऽऽ, ... त्यात काय."

दोघांनी बरेच बेत केले. गुरांना सोडीत त्यांनी आरडाओरडा करून कल्पनेतल्या वाघाला पळवून लावलं. ते तीरकामठा घेऊन तोंडानं वेगवेगळ्या पक्ष्यांचे आवाज काढीत निघाले. समुद्रकिनारा जवळ आला. समुद्रातल्या होड्या दिसू लागल्या. कान्होबानं एका होडीकडे बोट दाखवलं.

"ए क्रिश्ना, चल त्या होडग्यात जाऊ या."

"ते लोकांचं आहे. विचारल्याशिवाय गेलो तर पिटतील आपल्याला."

"मारलं तर पाहू, चल तर आता."

ते दोघंही त्या होडीत आले. बराच वेळ कान्होबा श्रीकृष्णाला वल्हं मारायला शिकवीत होता. ते दोघं आपल्या गुरांकडे आले, तेव्हा बरीच संध्याकाळ झाली होती. त्यांचे ते दिवस मजेत सरकत होते. सकाळपासून संध्याकाळपर्यंत मोकळ्या हवेत निसर्गाच्या कुशीत ते मनसोक्त खेळत असल्यामुळं त्यांची प्रकृती खूपच सुदृढ दिसू लागली. त्यावर आगळं तुकतुकीत तेज फुलु लागलं.

पावसाळा नुकताच ओसरल्यामुळं सर्वत्र हिरवंगार दिसत होतं. शेतंही भरघोस आलेल्या पिकांनी सुखावून डोलत होती. त्यांचा पिवळसर रंग उन्हानंही उचलला होता. हवेतही सुखद गारवा होता. नित्यनियमाप्रमाणं दोघंही गुरं घेऊन रानात गेले. गुरांना सोडून दोघंही समुद्रात पोहू लागले. पोहण्याचे श्रम श्रीकृष्णाला सहन करणं कठिण वाटू लागताच तो बाहेर आला. थोड्या वेळानं कान्होबाही आला. श्रीकृष्णाला तिथंच बसवून कान्होबा जवळच असणाऱ्या

वडाच्या पारब्यांना झोके घेऊ लागला. सूर्य मध्यान्ही आला तेव्हा त्यांना कडकडून भूक लागली. दोघंही चालंत-चालंत आपल्या नेहमीच्या जागी आले. हात-पाय धुऊन त्यांनी भाकरी खाल्ली. पाणी पिऊन दोघंही तृप्त झाले, कान्होबाचं शरीर जड होऊ लागलं, डोळेही झाकळू लागले.

"क्रिश्ना, मला खूप झोप येतेय, मी झोपतो, सूर्य कलला की उठीव."

"नीज तू."

समोर डेरेदार पिंपळ फांद्या पसरून उभा होता. त्याची सावली अगदी दाट होती. जमिनीवर मात्र वाळलेल्या पानांचा ढीग होता. कान्होबानं थोडीशी जागा साफ केली. खुष होऊन त्यानं कांबळं पसरलं. मुंडासं डोक्याखाली घेऊन, त्यानं डोळे मिटले. क्षणभरात त्याच्या घोरण्याचा आवाज येऊ लागला. श्रीकृष्णही बसल्या जागी पेंगू लागला. गुरं चरत-चरत दूरवर गेली. तेव्हा एका गुराख्यानं कृष्णाला हलवलं.तो उठला. कान्होबाची मजा करण्यासाठी लहानशी काटकी घेऊन तो झाडाकडे वळला. समोरच्या दृश्यावर त्याची नजर खिळून राहिली. तो थरथरू लागला. त्याच्या तोंडातून आवाजही फुटेना. पाय न वाजवता मागं सरकून, पलिकडे गुरांकडे पहात असलेल्या बाबल्याच्या जवळ गेला.

"बाबल्या, कान्ह्याच्या डोक्याकडं पिवळा धमक नाग."

"काय तरीऽऽऽ" बाबल्या त्याच्याकडं अविश्वासानं पहात राहिला.

"नाय रेऽऽ, अगदी खरंऽ"

"चल बगू या."

श्रीकृष्णाबरोबर बाबल्या पिंपळाकडे येऊन उभा राहिला. खरोखरच पिवळाधमक पंचमुखी नाग कान्होबाच्या डोक्याशी वेटोळं घालून बसला होता. त्याच्या चेहऱ्यावर पडणाऱ्या सूर्यकिरणांना आपल्या फणेने तो अडवित होता. तो देखावा पाहून बाबल्या चकित झाला. त्याला भयही वाटलं. दुष्ट, अशुभ शंका त्याच्या मनात लवलवू लागली. ते दोघंही हातात हात घालून तस्सेच उभे राहिले. सूर्य सरकल्याबरोबर किरणंची जागा सरकली. नागानं आपल्या फणेची दिशाही बदलली. आता साप कान्होबाला दंश करणार, अशी भीती वाटून श्रीकृष्ण कंपित झाला.

"कान्होबाला हाक मारू या कारं?"

"नकोऽऽ, हो हळदुवो नाग घरचो संमंध. इलंल्या वाटेनं जायल. आपण हिथं बसून राघूला तुम्या घरी पाठवू या."

दोघंही हलक्या पावलांनी बाजुला गेले. क्षणभरात ते परत येऊन पाहू लागले.

कान्होबा कुशीला वळत होता. हळूहळू त्या नागानं पुन्हा लहानग्या कान्हुवर पंचमुखी नागाने उन्ह लागू नये म्हणून छाया धरली.

आपल्या फणेनं सूर्यकिरणांना अडवलं.

"अरे बापरेऽ, आता काय होणार हे बाबल्याऽऽ."

"तू गप रव क्रिश्ना."

सूर्य आता, आपल्या किरणांचा, प्रकाशाचा पसारा आवरू लागला. गुरांना घरी न्यायची वेळ झाली. राघूकडून खबर समजताच जोशीबुवा धावत धावत आले. त्यांना भयंकर धाप लागली होती. सापाचा रंग, त्याच्या फणेवरचा दहाचा आकडा त्यांनी पाहिला. तो नाग असल्याची त्यांच्या मनानं ग्वाही दिली. त्या नागानं कान्ह्याला दंश केला तर बिंबव्वा आपली गय करणार नाही, अशी त्यांना भीती वाटली. त्यांचं शरीर घामेजून गेलं. इतक्यात सूर्याचा प्रकाश फिका झाला, नागाचं काम संपलं होतं. त्यानं आपली फणा मिटून टाकली. वेटोळे सोडून तो सरपटत करवंदाच्या जाळीत परत निघून गेला. जोशीबुवांचा रोखलेला श्वास बाहेर पडला. त्यांनी

पुत्राला निरखून कान्होबाकडे नजर फेकली.
"कृष्णा, कान्ह्याला उठव जा."
श्रीकृष्ण सापाच्या भयानं थरथरणारी पावलं टाकीत कान्होबाकडे गेला. त्यायाकडे न्याहाळून पाहिलं.
"कान्हू, उठ, सूर्य तरला बग."
"अरेच्या, हा उठलोच."
कान्होबा आळस झटकीत उठला. आपलं पायताण, घुंगुरकाठीनं बाजूला करून, त्यानं कांबळ्याची घडी केली. मुंडासं मस्तकी ठेवून, त्यानं पायताणात पाय घातला.
"चल रं."
समोर उभं असलेले जोशीबुवा आणि आठ-दहा गुराख्यांच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही. जोशीबुवा सुखावले.
"कान्होबा, तुझ्या मस्तकावर नागानं फणा धरली होती. तू "राजा" होणार बघ!"
जोशीबुवांच्या शब्दांत नेहमीप्रमाणं उपरोध असल्याचं जाणून तो गंमीतनं हसला.
"मी आणि राजा! गोष्टीतला असंन."
"कान्होबा, मी तुझी चेष्टा करीत नाही. खरंच सांगतो, तुझं भविष्य उज्ज्वल आहे."
"म्हंजे काय?"
"अरे, तू मोठ्ठा माणूस होणार, यात शंका नाही."
"गुरुजी, मी दांडगट, उनाड, खायला काळ समजून आवशीनं हिथं आनलं. तुमी ठोंब्या, दगडोबा, रेडा ठरवून मला मोकाट सोडलंत. अन् आज राजा, मोठ्ठा मानूस म्हनताय!" तो हंसत सुटला.
"कान्होबा माझं चुकलंच बघ."
"गुरुजी, तुम्ही काय म्हनताय ते मला समजतच नाही. माझ्या हाती तलवार नाही की भाला नाही. फिरंग्यासारख्या होड्या दिकुल नाहीत. मग मी मोठा मानुस कसा होनार? साद्या दगडाचा थोरला डांगर झाल्याचा कुनी पाहल्याय व्हय?
"कान्होबा, आता न बोलता घरी जाऊ. शेजारच्या कुंटेभटाला विचारू तो सांगेल त्यावर विश्वास ठेवशील ना?" जोशीबुवांनी त्याला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला.
"होऽऽ, ते पुढलं सांगतात म्हणे. खूप मानसं विचारावेस येतात."
जोशीबुवा मुलांना घेऊन घरी आले. अंगणातल्या माडाच्या आळ्यात पाय धुऊन ते घरात प्रवेशले. त्यांची पत्नी देवघरात तेलवातच लावीत होती. मस्तकावरची पगडी खुंट्याला अडकवून त्यांनी कानोसा घेतला.
"ऐकलेस का गोऽऽ, आम्ही आलोंत म्हटलं! भोजनाचे लवकर होऊ दे. आम्हास कुंटेभटाच्या येथं जायचंय."
लक्ष्मीबाई तेलाची बुधली घेऊन रांधपघरात आल्या. त्यांनी चुलीवरचं भांडं उतरलं आणि अंगावरच्या जुनेऱ्याला हात पुसत उंबरठ्यात येऊन उभ्या राहिल्या.
"आताच काय नडले तिथं जायचं?"
जोशीबुवांनी सुपारी कातरली. पानाला चुना लावून, त्यात काथ, तंबाखू टाकीत ते उत्तरले.
"अगोऽऽ, आज सगळं नवलच घडले."
"कसचेंऽऽ?"
"आपल्या कान्होबाचं."
"त्याचे काय झाले? अक्षरे काढली... की... पाढे मोजले?"

“थांब आता, पुढचे बोलू नकोस. मी सांगतो ते ऐक.” अगोऽऽ, आज दुपारी तो झाडाखाली झोपला, तेव्हा त्याचे मस्तकावर भल्या मोठ्या हळद्या नागानं फणा धरली. तो आता राजा झाल्याशिवाय रहाणार नाही. खात्री करून घेण्यासाठी कुंट्याकडे जायचे, नाहीतर शिंच्याकडे जातो कोण?” जोशीबुवा हसले.

“असे काही असेल, तर आता रांधते, चांगल्या कामास विलंब कशास?”

लक्ष्मीबाईंनी समई आणून माजघरात ठेवली. दोन पाट मांडून, ताटही ठेवली. आज कान्होबाची पत्रावळ त्यांनी श्रीकृष्णाच्या जवळच ठेवली. त्यावर आज गुळचूनही दिसत होतं. त्यांनी सर्वांन गरम-गरम भात वाढला.

“चला जेवायला, वाढलं आहे.”

“कृष्णा, कान्होबा चला रेऽऽ” जोशीबुवा आत आले.

कान्होबा जेवत होता, परंतु त्याचं लक्ष जेवणात नव्हतं. पहाटे पाहिलेल्या स्वप्नाचा, तो जोशीबुवांनी केलेल्या भाकिताशी मेळ घालीत होता. लक्ष्मीबाई त्याच्याकडे कौतुकानं पहात होत्या. तो व्यवस्थित जेवत नसल्याचं त्यांच्या ध्यानी आलंच.”

“कान्होबा, आत्तापासूनच एवढे हरवायला नको बरे!”

“आई, तुम्ही म्हणता तसं नाहीये. सकाळी पडलेल्या सपनाचा विचार करीत होतो.”

“कसलं स्वप्न पडलं रे कान्हू?” श्रीकृष्णानं आश्चर्यानं विचारलं,

“मघाच का नाही सांगितलेस ते?” जोशीबुवांच्या हातातला घास तसाच राहिला.

“कान्होबा, कसले स्वप्न ते लवकर सांग.”

“आई, फाटेपारी कोंबडा आरवल्यानंतर मी उठणार होतो. परंतु तुमची हाक येईपर्यंत मी डोळे मिटले. थोड्या वेळात मला खूप जहाजं, होड्या दिसू लागल्या. त्यातून खूप मंडळी उतरली. त्यातला प्रत्येक माणूस माझ्यासमोर येऊन मुजरा घालू लागला. अगदी खेमसावंतांपुढं करतात तस्सा!”

“तुझं स्वप्न भाग्यसूचकच आहे कान्होबा.”

“तुला सोलकढी वाढू कारे कान्हा?”

“नको बाई, पोट भरले.”

“कृष्णा, तूंस काय पाहिजे? तू आज जेवला नाहीस. कान्होबा राजा होईल, तू काय गुराखीच रहाणार?”

“आई, असं नाही. मी राजा झालो, तर कृष्णासुदीक कोनतरी होनारच!”

“तुझ्या तोंडी गुळचून घालीन बाबा.” लक्ष्मीबाईचा स्वर गहिवरला.

बऱ्याच रात्री ते तिघंही आनंदानं घरी आले. लक्ष्मीबाई घरातली झाकपाक करून, त्यांची वाट पहात बसली होती. जोशीबुवांनी मस्तकावरची पगडी आणि अंगातली बाराबंदी खुंटाळ्याला अडकवली.

“अगो, या कान्हाच्या हातावर राजयोग आहे राजयोग! याच्या हातावर पराक्रम आणि राजयोग असल्याचं त्यानं मला दाखवलं. तरीही मी त्याला याची कुळकथा सांगितली. पऽऽण तो आपलं म्हणणं मागं घेण्यास तयार नाही. शेवटी त्याने आपले शब्द ‘काळ्या दगडावरची पांढरी रेघ’ असल्याचे स्पष्ट केले.”

“बरे झाले, आमचा कान्हा राजा झाला, तर आमची गरीबी संपेल कदाचित! काय कान्हा? काही करशील का?”

“होऽऽ, आई तुम्ही अन्नपूर्णा, तुम्या हातचं अन्नं माझ्या पोटात गेलंय. तुम्हाला मी कधीच विसरणार नाही.”

“कान्हू, माझी तुला आठवण होईल का रे?”
“क्रिश्ना, तुला तर मी संगच न्हेणार आहे.”
“मग आपण दोघं घोड्यावरूनच आमच्या घरी यायचं बरं का!”
“पुरे रे कृष्णा, बाजारात तुरी आणि भट भटणीला मारी, तसं करतोयस तू.”
लक्ष्मीबाईंच्या शब्दांनी सर्वांना हसवून सोडलं. बराच वेळ त्या घरात, हास्य लहरी उमटत राहिल्या.

* * *

सकाळ झाली. लक्ष्मीबाईंनी कान्होबासाठी धिरडी केली. त्याला भरपूर खाऊ घालून थोडी बरोबर दिली. त्यानं त्यांच्या पायावर डोकं ठेवून नमस्कार केला. श्रीकृष्णाला तो कडकडून भेटला. एकेमकांपासून अलग होताना दोघंही खूप रडले. कान्होबानं सर्वांचा निरोप घेतल्यावर जोशीबुवा त्याला घेऊन चालू लागले. मार्गात मुकं होऊन चालत असलेला कान्होजी सुवर्ण दुर्गाचे बुरुज दिसताच बोलू लागला. त्याने प्रत्येक बुरुजाची माहिती द्यायला सुरुवात केली. जोशीबुवांना आता त्यांच्या बुद्धिमत्तेचा साक्षात्कार होऊ लागला.
ते दुर्गात आले. ती परिचित जागा पाहून कान्होबाचं मन आनंदानं उचंबळू लागलं. कान्होबासह जोशीबुवा आल्याची खबर मिळताच बिंबाबाईचं मन पुत्राच्या चिंतेनं कासावीस झालं. जोशीबुवा तिच्यासमोर आले.
“का वो जोशीबुवा, ह्या द्वाडानं तुम्हालासुदीक येश दिलं नाही ना?”
“आईसाहेब, तुमच्या ह्या पुत्राला राजयोग आहे. आता योग्य संधी प्राप्त करून देण्यात फायदा आहे.”
“जोशीबुवा, असली मस्करी करून तुम्हाला काय मेळणार?”
“आईसाहेब, चेष्टा नव्हे. मी अगदी खरं बोलतोय.”
“माजा “कान्हू” राजा झाला, तर आई काळंविकेला पाच पुतळ्यांची माळ घालीन.”
“आईसाहेब, मला हो काय देणार ”
“काय पायजे?”
“मी कसंत असलेली शेतं मला मिळावीत.”
“देईल माझा कान्हू.” बिंबाबाईनं त्याच्या मस्तकावरून हात उतरून आपल्या कानाजवळ बोटं मोडली.
“जोशीबुवा, लिवाय-वाचाय आल्याबिगर हा राजा कसा होनार?”
“तुम्ही चिंता करू नका, सगळं ठीक होईल. ती ह्याला माझ्या गुरुच्या पायावर घालून आणतो.”
“तुमच्या मनास येईल तस्सं करा.”
बिंबाबाईनं पाच नारळ, चुरगळलेला हिरवा खण आणि कुडंवभर भात आणून ठेवलं. त्याच सुपात गुळाचा खडा ठेवला.
“कान्हू, भटाला मोकळ्या हातानं जाऊ देऊ नकोस.”
“हो.”
कान्होबानं ते सूप जोशीबुवांच्या समोर ठेवून भक्तिभावानं नमस्कार केला.
“आयुष्यमान भव... कीर्तिमान भव.”
“कान्हू, आतून शहाळं आण जा.”
कान्होबानं शहाळं आणलं. तो अंगणातल्या सुळक्यावर बसला. हिरवीगार सोडणं बाजूला

झाली. मग त्यानं शहाळ्यावर कोयता मारून कपची काढली. खोबऱ्याचा पातळ पापुद्रा परंतु पाण्यानं भरलेलं शहाळं त्यानं जोशीबुवांच्या हाती दिलं. त्यांनी ते ओठाशी धरलं. घटाघट गोड पाणी पिऊन ते तृप्त मनानं बाहेर पडले.

* * *

जोशीबुवा चिपळुणात आले. त्यांचं मन खूपच प्रसन्न झालं. बुवांनी एका झाडाखाली बसून चंची सोडली. कान्होबा त्यांच्या जवळ बसला. ओबड-धोबड काळ्याकभिन्न डोंगरांच्या रांगा, हिरव्यागार वृक्षराजीनं नटलेला उंच कडा, त्यावरून ओघळणारे पाण्याचे ओहोळ आणि दुसऱ्या बाजूला उफाळणाऱ्या समुद्राकडे चौदा वर्षांचा कान्होबा पहातच राहिला. तोंडातली लालबुंद थुंकीची पिचकारी मारीत जोशीबुवा उठले. उपरणं झाडीत त्यांनी मस्तकावर पगडी ठेवली.

“बाबा, अजून किती लांब जायचं?”

“अगदी थोडं आहे... दमलास की काय?”

“छे:-छे:, नुसतंच विचारलं.”

ते पुढं चालू लागले. आता मार्गावर दुतर्फा वड, पिंपळाची झाडं दिसू लागली. किलकिलाटही कानी आला. पुढं गेल्यावर स्वच्छ निळसर पाण्यानं भरलेला तलाव त्यांना दिसला. त्यात तांबडी, पांढरी, पिवळी कमळं फुललेली होती. त्यात सुरकांड्या मारणारे मासे जणू लपंडाव खेळत असल्याचा कान्होबाला भास झाला. तलावापासून दहा पावलांच्या अंतरावर गवतानं शाकारलेली झोपडी होती. त्याभोवती माड, पोफळींनी गच्च छाया केली होती. मधूनमधून फुलझाडंही डोकावत होती. मंद सुवासानं वातावरण गंधित झालं होतं.

“बाबा, कुठेत हो तुमचे गुरू?”

“शूऽऽक् बोलू नकोस.”

झोपडीतून एक हात बाहेर आला. तो हात हळूहळू वळला. आणि गंभीर आवाज ऐकू आला.

“या इकडे.”

जोशी कान्होबासह आत प्रवेशले. आत प्रचंड गुहा असल्याचा त्यांना भास झाला. ते चालंतच राहिले. बरंच आत गेल्यावर प्रशस्त दालन दिसलं. गणपतीची भव्य मूर्ती होती. त्याच्या सभोवार मृगाजिन, व्याघ्राजिन आणि काही शस्त्रं होती. एका खडबडीत डोंगरी भिंतीवर धनुष्यबाण, पोथ्या, औषधी वनस्पती दिसत होती. कान्होबा आश्चर्यानं पहातच राहिला. जोशीबुवांनी हात ओढताच तो मूकपणे चालू लागला. पुढे गच्च टणटणीत अंधार होता. ते आपटंत-धोपटंत चालतंच राहिले. खोल विवरांतून ते पुन: दालनात आले. जमिनीवर लहानसा दगड होता. त्यातून बहेर पडलेल्या प्रकाशकिरणांच्या अंधुक उजेडात त्यांना गजाननाची मूर्ती दिसली. तिथंही शस्त्रं आणि पोथ्या व्यवस्थितपणे रचून ठेवलेल्या होत्या. मूर्तीपाशी स्वामी बसले बसले हेते. दोघांनी त्यांना नम्र नमस्कार केला.

“बसा, इथलं सगळं काही गुप्त ठेवण्याची मनोमन शपथ घ्या.”

दोघांनी डोळे मिटले. शपथ पुटपुटत त्यांनी समोरच्या गणेशाला नमस्कार केला. त्याच्या मुद्रेवर समाधान पसरल्याचं जोशीबुवांच्या ध्यानी आलं.

“बाळाजी, बाहेर येऽऽ”

त्या भव्य मूर्तीच्या मागून सडसडीत शरीरयष्टीचा, गोरापान,निळ्या डोळ्यांचा तेजस्वी गृहस्थ बाहेर आला. त्यानं स्वामींच्या पायावर मस्तक ठेवलं, त्यांनी त्याला स्थान दाखवताच तो उजवीकडे वळून आसनावर बसला.

“मुला... तुझं नाव कान्होजी ना?”

“होय महाराज.” त्यानंही त्यांच्या पायावर मस्तक नम्र केलं.
“बाळाजी आणि कान्होजी तुम्ही दोघंही पराक्रमी आहात. आम्ही सांगू त्याप्रमाणं वागाल?”
“होय महाराज.” दोघांनी एका सुरात उत्तर दिलं.
“ऐका, या आमच्या हिंदुस्थानात धर्मांचा छळ सुरू आहे. शिवाजी महाराज गेल्यापासून गो, ब्राह्मण आणि स्त्रियांवर संकटं कोसळंत आहेत. त्यांना रक्षणकर्ता न लाभल्यामुळे इस्लामी सत्ता बेबंद झालीय. त्या पाशवी शाहीचा संहार करण्यासाठीच आमचा अवतार आहे. बाळांनो तुमच्याकडून आम्ही ते कार्य करविणार आहोत.”
क्षणभर शांतता पसरली. तिघंही समोरच्या तेजाकडे पाहू लागले. स्वामींचा देह सडसडीत असूनही पिळदार होता. कमरेत केशरी आच्छादन होतं. पायात खडावा होत्या. त्यांचा काळा कुळकुळीत तकाकणारा जटाभार त्यांच्या गोऱ्या मानेवर रुळत होता. रुंद कपाळावर भस्मांचे पट्टे होते. नाक सरळ असून थोडंसं पुढं आलं होतं. कानात मोत्यांची कुंडलं होती. त्यांच्या नेत्रात लहान लहान सूर्य होते. काळीभोर दाढी छातीवर रुळत असून त्यांच्या जाडसर ओठावर मिशांचे झुपके होते. त्यांनी बाळाजीकडे पाहून स्मित केले.
“बाळाजी तू देशावर जा. तिथंच तुझ्या पराक्रमाला संधी आहे.”
“महाराज, नोकरीऽऽ.”
“समजलो, तू सिद्दीची मिठागरावरची नोकरी सोडून जा. घाटावरंच तुझा उत्कर्ष आहे. राज्यकर्ता होण्याचा मान तुला मिळणार आहे. दिल्लीची पातशाही तुझ्या नाकदुऱ्या काढण्याचा योग आहे. मात्र तू धीरानं पुढं पाऊल टाक.”
“महाराज, आपल्या मार्गदर्शनाखाली सांगाल ते करण्याची तयारी आहे. परंतु कुटुंबाला कुठं ठेवू?”
“चिंता न करता श्रीवर्धनात ठेव, आम्ही त्यांची व्यवस्था करू.”
“आता घाटावर कुणाकडं जायचं ते सांगावं.”
“तू सासवडास जा. तिथे पुरंदऱ्यांना भेट. ते तुला योग्य मार्गांने नेतील.”
“महाराज, आपली आज्ञा शिरोधार्य आहे.”
“आमचा तुला आशिर्वाद आहे.”
ब्रह्मेंद्रस्वामींच्या मुद्रेवर समाधानाचं स्मित फाकलं. त्यांनी काही अपेक्षेनं कान्होजीकडे पाहिलं. त्यांची तीक्ष्ण, भेदक नजर कान्होजीच्या हृदयातून आरपार गेली. त्यांच्याकडे पहाणारी त्याची नजर मृगाजिनावर स्थिर झाली.
“कान्होजी तुला राजयोग आहे. आम्ही सांगू त्यानुसार तू वागशील?”
त्याला काय बोलावं हेच समजेना. तेव्हा जोशीबुवा त्याच्या पाठीवर हात ठेवून उत्तरले.
“महाराज, लेकरू आज्ञेच्या बाहेर जाणार नाही. आपण सांगावं.”
“ठीक, तू अचलोजी मोहितेला जाणतोस का?”
“होय, ते सुवर्ण दुर्गाचे किल्लेदार.”
“तो सिद्दीला वश आहे. तो घात करणार आहे. त्याला दूर करण्याचे काम तू कर.”
“महाराज, त्यांच्याकडे जायचे कसे?”
“तू नोकरीसाठी जा. मग तुला पुढचे रस्ते दिसू लागतील.”
“आपल्या आज्ञेप्रमाणे करीन महाराज.”
स्वामींनी दोघांच्याकडे अगदी निरखून पाहिलं. दोघांचेही तेज त्यांनी चांगलेच परखले. ते स्वत:शीच हसले.
“बाळाजी-कान्होजी एकमेकांना पाण्यात पाहू नका. अन् एकदिलाने वागा. ईश्वर तुम्हाला

सहाय्य करील.''
दोघांनी त्यांच्या पायावर डोके ठेवून नमस्कार केला.
''बाळाजी-कान्होजी तुम्हाला धनाची आवश्यकता आहे. पलिकडे ते खोरण दिसतंय ना! त्यात हात घालून घ्या.''
दोघांनीही जाऊन होन आणले. स्वामींनी भिंतीवर लटकत असलेली शस्त्रं त्यांच्या हाती देऊन जोशीबुवांकडे दृष्टी फेकली. ते गाढ निद्रेत होते. स्वामींच्या नजरेनंच त्यांना बसतं केलं, ते उठून पुढं आले. अतिशय श्रद्धेनं ते त्यांच्या समोर नम्र झाले.
''हा घे तुला'' जोशीबुवांनी कपाळाला लावून तो प्रसाद खिशात ठेवला.
''बाबा, हे स्वामीमहाराज कुठनं आले?''
''तुला माहीत आहे का रे बाळाजी?''
''नाही हो जोशीबुवा मला काहीच ठाऊक नाही.''
''मग तू आलास कसा?''
''मला पहाटे साक्षात्कार झाला, म्हणून निघालो. कुणीतरी येऊन मला वाट दाखवी त्याप्रमाणं मी चाले.''
''गंमतच आहे... बाबा, सांगा लवकर.''
बाळाजी-कान्होजीची उत्सुकता वाढली. ते दोघंही त्यांना सारखा आग्रह करू लागले. जोशीबुवांनी हळूच नमस्कार केला.
''बाळांनो ते वऱ्हाडातल्या दुधेवाडीचे. त्यांचे नाव विष्णू महादेव भट्ट. त्यांचं घरातलं लक्ष उडालं. आठ वर्ष पूर्ण होताच त्यांनी घर सोडलं. गणपतीच्या मंदिरात त्यांनी बारा वर्ष जप केला.''
''पुढं सांगा.''
''मग ते उत्तरेत गेले. थोड्या वर्षांनी परत येऊन, ते चिपळूणात धामणी-सोनगावच्या डोंगरात मुकाटपणानं राहिले आहेत.''
''त्यांची माणसं कुठेत बाबा.''
''कान्होबा, आपणच त्यांची माणसं.''
''कान्होजी, तू आणि मी त्यांची मर्जी राखून त्यांना समाधानात ठेवू.''
''एकदम कबूल बाळाजी'' कान्होजीनं त्याचा हात हाती घेतला.''
मार्गात त्यांना तहान लागली. एका विहिरीवर जाऊन ते. पाणी प्याले. जोशीबुवांनी सहजपणे खिशावर हात ठेवला. कान्होबाचं त्यांच्याकडे लक्ष गेले. पुन्हा चालू लागताच त्याने आपली उत्सुकता प्रकट केली.
''बाबा, महाराजांनी तुम्हाला दिलेला प्रसाद दाखवा.''
जोशीबुवांनी हसून खिशातला दगड काढून त्याच्या हाती दिला. सूर्यप्रकाशात त्याची चमक दिसताच बाळाजी अवाक् झाला.
''जोशीबुवा हे साधं काम नाही. अस्सल हिरा असावा असं वाटतं. लपवून ठेवा, नाहीतर सिद्दीसाथीचे लोक पळवतील.''
''बरं बाबा सांगितलंस ते! मला वाटलं तो दगडच आहे.''
''बाबा, परखायची दृष्टी असली की काळ्या दगडातली ही चमक दिसू लागते.''
''अगदी खरं आहे बाळाजी.''
कान्होजी घरी आला, त्यानं हातपाय धुऊन मावळत्या सूर्याला नमस्कार केला. रांधपघरात जाऊन मातेच्या पायाची धूळ कपाळाला लावली.

"कान्हू, दमला असशील लवकर जेवून नीज बाबा."
"आयेऽऽ, तू मला फाटी-फाटी हाक मारशील का?"
"इतक्या लवकर कोठे जायचे तुला?"
"सुभेदाराकडे! नोकरीसाठी."
"तो मोह्यत्या व्हंय! तो तुला ठेवणार नाही."
"आनी त्यानं नोकरी दिली तर! महाराज त्याला तशी बुद्धी देणारच."
"त्यानं तुला रूजू करून घेतले, तर तुला एक बांगडा जास्त वाढेन."
"एवढ्यावर नकोच पैज." तो जरासा रुसलाच.
"मग लगीन करून देईन."
दोघांच्या हसण्यानं घर भरून गेलं. कान्होजी जेवून अंथरूणावर पडला. परंतु रात्रभर त्याला स्वामीच दिसत राहिले. दिवस उगवला. सोनेरी किरणं घरात घुसताच कान्होजी घराबाहेर पडला. माड-पोफळीतून चालंत-चालंत तो एका वाड्यापाशी आला. तो वाडा अचलोजी मोहितेचा होता. द्वारावर पहारेकरी होता. कान्होजीला निरखत त्यानं विचारलं.
"ए पोरा, इकत्या सकाळी कशाला आलांव?"
"मला सुभेदाराला भेटायचंय."
"कशाला?"
"आल्यावर सांगेन, आत्ता सोड."
"जा ह्या वाटेनं जा."
कान्होजी सरळ आतल्या दरवाजाकडे गेला. अचलोजी भरदार मिशांना पीळ भरीत पुढच्या दालनात उभे होते. त्यांचा रुबाब फार होता. अतिशय कडक आणि क्रूर स्वभाव असल्यामुळं हाताखालचे लोक त्यांना फार भीत असत. त्यांच्याबद्दलच्या अनेक हकिगती त्यानं आपल्या पित्याकडून ऐकल्या होत्या. ते सगळं आठवीत त्यानं मुजरा केला. त्याला डोक्यापासून पायापर्यंत न्याहाळीत ते जोरात खेकसले.
"काय आहे रे?"
"सरकार, नोकरीसाठी आलोय."
"कोन रं तू?"
"मी तुकोजी संकपाळाचा."
"तुजा बा व्हता न्हवं आमच्या नोकरीत?"
"व्हंय."
"पन तू काय काम करणार?"
"आपुन सांगाल ते करीन."
"मग उद्यापासून ये."
"सरकार, चांगला मुहूर्त आहे, आजपासून ठेवावं."
त्याच्या आर्जवी शब्दांचा प्रभाव अचलोजीवर पडलाच. तो जरा कौतुकानं हसला.
"बरंऽ पोरा आजपासून कर. शिवाजी मोरला भेट. तो तुला काम सांगेल."
"जी सरकार."
कान्होजी कृतज्ञतेनं मुजरा करून निघाला. त्याची पडणारी दमदार पावलं, वागण्यातली हुषारी आणि आपल्यासमोरही बोलण्याचं धैर्य पाहून अचलोजी खूष झाला. आपल्या स्वत:च्या कामात ह्याची चांगलीच मदत मिळेल असा विचार करून तो हसला.

* * *

कान्होजीला ब्रह्मेंद्रस्वामीचे शब्द आठवत होते. परंतु योग्य संधीची ते वाट पहात होते. त्यासाठी ते रात्रंदिवस सागर किनाऱ्यावरच असते. तसं पाहिलं तर समुद्रावर त्यांचं फार प्रेम होतं. सूर्याबरोबर सागराला नमस्कार केल्याशिवाय ते न्याहारी करत नसंत. सकाळ दुपार सायंकाळची भिन्न रूपं पहाताना ते तहान-भूकही विसरून जात असंत. सूर्य वर चढत मध्यान्हीत प्रवेशला. त्याची तप्त किरणं सागरात शिरली. मासे पाण्यातून डोकावले. किरणांना तोंडात घेऊन ते सुळकांड्या मारू लागले. कान्होजी सुवर्णदुर्गाच्या दर्याबुरुजावर उभे होते. समोरून येणारं प्रचंड जहाज त्यांच्या तीक्ष्ण नेत्रांनी टिपलंच. मनाशी विचार करून ते खाली उतरले. आपल्या बरोबर काम करणाऱ्या सहकाऱ्यांना ती खबर देऊन ते करकर पायताण वाजवीत घराकडे वळले. बिंबाबाई रांधपघरात होती. घरात येऊन त्यांनी पायताण काढून मुंडासं खुंटाळ्यावर ठेवलं, आणि आईला साद घातली.

"ए आयोऽऽ, आज काय केलंस?"

"सरंग्याचे सांबरे आणि भात."

"सरंगा भाजीन तू ये तोंड-हात-पाय धुऊन."

बिंबाबाईनं लाकडं फुंकरून चुलीवर तवा ठेवला. चार तुकडे त्यावर टाकून खोबरेल घातलं. तळल्या माशांचा घमघमाट सुटला. कान्होजी अंगरख्याला हात पुसंत आत आले. पाटावर बसून ते पोटभर जेवले. पाणी पिऊन झाल्यावर ढेकर देत त्यांनी आपल्या आईकडे पाहिलं.

"आये, आज राती मी येनार नाही. तू वाय बघू नकोस."

"कुनाकडे कोंबडे आहे?"

"तसं नाही. कामाला जायचं आहे."

"मग भाकर आणि मासा न्हे."

"बरंऽऽ" कान्होजी उठून मागील दारी गेले.

"मानाजी, नरसिंग, दत्ताजी, तुका वगैरे दहाजणांनी घोड्यांवर मांडबुलंद बैठक घेतली. घोडे दौडू लागले. सूर्य मावळतीला जात होता. त्याची लालीलाल किरणं समुद्राच्या लाटांवर नाचत होती. कावळे आणि इतर पक्षी घरट्यांकडे परतत होते. डेरेदार वृक्ष किरणांना सूर्याच्या स्वाधीन करून पक्ष्यांची वाट पहात होते. कान्होजीनं चहूकडे नजर फेकली. काहीतरी सरपटत गेल्यासारखं वाटलं परंतु त्याकडे त्यांनी लक्षच दिलं नाही.

"दत्ता, नांगरून ठेवलेल्या गुरबेकडे चला."

"होय, जाऊन एकदम घाला घातला की फारच गंमत!"

दत्ताजी हसंत सुटला. इतरांचं हंसणं त्यात मिसळून गेलं. कान्होजी मात्र योजना आखण्यात गुंग होते.

ते तिथं पोचले तेव्हा मोठ्या प्रशस्त गुरबेतून हमाल सामान उतरीत होते. काळेकुळीत, लंगोटी लावलेले धनगर गुरब्यातून दिलेली जडजड ओझी बाहेर आणीत होते. ओझ्याचा भार हलका होण्यासाठी ते गात होते. "आला हेऽऽ रामा होऽऽ उठवा होऽऽ कामा."

"चला रे चौकशी करू या."

दत्ताजी, श्रीपती, मानाजी, कान्होजी बरोबर पाय उतार होऊन आत गेले. नाखुदा उभा राहून खालच्या गडबडीकडे पहात होता. त्यांच्या चालण्याचा खट् खट् आवाज येताच तो दचकला. त्याची नजर त्याच्यावर स्थिरावली. कान्होबानं करड्या स्वरात विचारलं.

"काय आणलंय?"

"रेशमी कापड."

"कुठं न्यायचं!"
"विजापूर-सोलापूर."
"हे तर कोकण. वाट चुकली की काय?" दत्ताजीनं खोचक प्रश्न केला.
"वारा पडला. गुरबा पुढं जाणार नाही म्हणून थांबलो."
"नाम क्या?" मानाजीनं विचारलं.
"फाजरमणी, सुरतेचा."
"परवाना कुठांय?"
नाखुदानं इशारा करताच एका खलाशानं परवाना दाखवला. ते दाघंही विजयी मुद्रेनं कान्होजीकडे पहातच राहिले.
"हा फिरंग्याचा दिसतोय."
"हा घ्या दुसरा."
"हा आहे विजापुरकराचा."
"और किसका मंगताय?" नाखुदानं रागानं विचारलं.
"ही मराठी दौलत. शिदोजी गुजराचा परवाना पायजे."
"हमारे पास नही."
"मग जकात भरल्याशिवाय जाता येणार नाही."
"क्या करोगे?"
"किल्ल्यावर चला म्हणजे दाखवतो."
"चला."
टणक काळोख पसरला. आकाशात कुठंतरी तुरळक चांदण्या होत्या. प्रकाशाच्या अनुरोधानं मार्ग काढीत घोडे धावू लागले. महंमद त्यांच्याबरोबर जात होता. मनाशी काहीतरी विचार करीत तो कान्होजीकडे निरखून पाहू लागला.
"तुम्हारा नाम क्या है?"
"कान्होजी आंग्रे."
"कहाँ के? आंगरवाडी के?"
"हाँ."
"यहाँ नये दिखाई देते हो."
"हाँ."
"इसलिएही तुम मुझे ले रहे हो. अरे यार, तुम माँगते तो मैं कपडा, सोना, मोती, भी दे सकता."
"मला तसला आदत नाही. मला काहीही नको."
"ते किल्ल्यात प्रवेशले तेव्हा सकाळ झाली होती. बालसूर्याच्या लालगुलाबी किरणांचा माणिकवर्षाव चालू होता. सागर उचंबळत येऊन, त्या किल्ल्याला न्हाऊ घालीत होता. थोडीशी वर्दळही सुरू झालेली दिसत होती. अचलोजी मोहिते दाढी कुरवाळीत सदरेत आले होते. पानाचं तबक पुढ्यात घेऊन, ते पानाच्या शिरा काढीत होते. कान्होजीनं मुजरा केला.
"सरकार, सुरतवाल्यांचं जहाज दस्तखताशिवाय हर्णे बंदरात आले."
"तुम्ही काय केले?"
"मी त्याला इथे घेऊन आलो."
"कुठं आहे?"
कान्होजीनी इशारा करताच, महंमदनं सदरेत येऊन सलाम केला. अचलोजीनं करड्या स्वरात

विचारलं.
“दस्तकत नही तो कैसे आए?”
“मराठोंका परवाना होना पडता है, यह मालूम नही था! एक बार माफ करिए!”
“कितने आदमी है गुरबेपर?”
“सौ, डेढ सौ.”
“ठीक, तोपे कितनी हैं ?”
“दस.”
“योद्धा कितने?”
“चालीस.”
“गुरबा किसका है?”
“वीरजी वोरा.”
“ठीक, कान्होजी गुरबा ताब्यात घ्या.”
“सुभेदारसाहब, कुछ भी ले लेना लेकिन इस वक्त हमको छोड़ देना.”
“क्या क्या है अंदर?”
“सिर्फ रेशमका कपडा.”
“हजार रुपयोंका कपडा रखो, बादमें हम देखेंगे.”
“अभी देता हूँ.”
कान्होजी तिथंच उभे होते. अचलोजीनं त्यांना खुणावताच ते महंमदाबरोबर बाहेर पडले. अचलोजीच्या लाचखाऊ वृत्तीचा त्यांना चांगलाच परिचय झाला. ते रागानं धुमसू लागले.

* * *

पावसाळा येताच नवऱ्याला भलंतच बळ आलं. समुद्राला उधाण आलं. प्रचंड लाटा सुवर्ण दुर्गावर आपटू लागल्या. होड्या, जहाज, गलबतं पाण्यातून काढून वाळूत उभी केली होती. किनाऱ्यावरच्या ओल्या मातीत कुरल्या, खेकडे मुक्त मनानं रांगोळ्या काढू लागले. त्यांची लहानगी पिल्लं मनमुराद खेळू लागली. सुवर्णदुर्गातले अधिकारी कामं नसल्यामुळं आळसात दिवस घालवू लागले. आषाढ-श्रावणांत आभाळ उघडून पाऊस बाहेर पडला. भाद्रपद येताच, गणपतीला भिऊन, त्यानं आपला पसारा आवरला. गौरी-गणपतीची धांदल उडाली. पाच दिवस घरचा पाहुणचार घेऊन गणपती सागरात जाऊन बसले. त्यांना उदरात स्थान दिल्यावर समुद्रानं उग्रतेचं कवच टाकून दिलं. तो खूपच सौम्य झाला. सुवर्णदुर्गातली हालचालही वाढू लागली. अधिकारी बुरूजांवरून टेहळणी करू लागले.
पौर्णिमेची रात्र होती. चांदणं फुललं होतं. माड, पोफळी, उंडली, पांगारे तकाकत आपल्या वैभवाचं प्रदर्शन करीत होते. बगळे चांदण्यारात्रीलाच दिवस मानून मासे पकडण्यासाठी एका खडकावर बसले होते. समुद्रात खूप दूरवर काळे ठिपके दिसू लागताच, कान्होजी एकाग्रतेनं पाहून ओरडला.
“दत्ता, मानाजी... सिद्दी येत असावा असा अंदाज आहे.”
“दादा, आपली तयारी आहेच... त्याला चांगलाच झोडून काढू. मी जाऊन अचलोजीस खबर करतो.”
कान्होजीचा होरा खरा ठरला. विजापुरकर, मोगल आणि जंजिरेकर सिद्दी एकत्र होऊन सुवर्णदुर्गावर चालून आले होते. गावाच्या बाहेर त्यांचा डेरा होता. शामियाने आणि राहुट्यांनी बरीच जागा व्यापून टाकली. सिद्दीनं थोडं सैन्य हर्णेत आणून, बाकीचे सैनिक मुरुडात पसरले.

दापोलीच्या सीमेवर विजापुरकराची फौज उभी राहिली. कान्होजीला पूर्वकल्पना होतीच. त्यानं आपलं सैन्य, तोफा, बंदुका तयार ठेवल्या. आपल्या लोकांनाही त्यानं सूचना दिल्या.

रात्रीचं चांदणं कमी होऊ लागलं. अंधाराचं प्रमाण वाढू लागलं. शामियाने, राहुट्या, डेरे निद्रेत मग्न होऊ लागले. दोनचार दिवस त्यांना झोपण्याची संवय लावून, एका रात्री कान्होजीनं गडावरून तोफा डागल्या. धाड्-धाड्-धाड् तोफांचा आवाज आकाशाला भिडला. बंदुकीतून गोळ्या सुटू लागल्या. कान्होजी आपल्या ‘‘जवाहर’’ वरून सर्वांना उत्तेजन देऊ लागले. दिवसरात्र लढाई सुरू झाली. आपल्या सैनिकांची होत असलेली हानी पाहून कान्होजी खूप दुखावले. त्यांना काही सुचेना. वेड्यागत त्यांची अवस्था झाली. भारावलेल्या, उदास मनानं त्यांनी ब्रह्मेंद्रस्वामींना हाक दिली. नमस्कार करून, मार्ग सुचविण्याची विनंती केली. त्यांच्या कानात आवाज घुमू लागला.

‘‘त्यांची रसद तोड, रसद तोऽऽड.’’

त्यांनी सैनिक पाठवून सर्व वाटा रोखून धरल्या. आलेली रसद आपल्या ताब्यात घेतली. अन्नाशिवाय मुसलमान सैनिक तडफडू लागले. आपापसात भांडू लागले. सर्वत्र असंतोषाचा डोंब उसळला. तरीही कान्होजी बेचैनच होते. वाढत्या रात्रीही दुर्गाच्या बुरुजावर ते उभे राहून विचार करीत होते. पांढरी कफनी घातलेला एक फकीर येऊन उभा राहिला. त्यानं आपली दाढी कुरवाळीत, किलकिल्या डोळ्यांनी त्यांच्याकडे पाहून घेतलं.

‘‘अलख निरंजऽऽन अल्लऽख’’

ते परवलीचे शब्द ऐकून, त्यांनी मागं वळून पाहिलं.

‘‘क्या खबर है?’’

‘‘आपली माणसं त्यांना फितुर झालीत. किल्ल्याचा दरवाजा उघडण्याचं वचन गेलंय.

‘‘ठीक आहे. तू जा’’ कान्होजी तिथंच बसून विचारमग्न झाले.

दुसऱ्या दिवशी मदतीसाठी आलेल्या मराठी फौजा हर्णेत दिसू लागल्या. अचलोजी अत्यंत खुषीत गुडगुडी ओढीत बसले होते. मानाजी सावंत येऊन त्यांच्या कानाशी लागला. हळूहळू त्यांचा चेहरा बदलत गेला.

‘‘तुला कसं समजलं?’’

‘‘कान्होजीनं सांगितलं.’’

‘‘ठीक आहे, ... आमची परवानगी आहे.’’

तो मुजरा करून रात्रीच्या काळ्याकुट्ट अंधारात गडप झाला. पलित्यांच्या उजेडात किल्ल्यावरचे व्यवहार चालू होते. हळूहळू पहारेकऱ्यांशिवाय सर्व चाहूल बंद झाली होती. पहारेकरीही बदलले. रामराव निकम पुढच्या द्वारावर आला. कान्होजीनी स्वत:च पाळत ठेवली होती. त्यांना मिळालेल्या खबरीची सत्यता पटली. त्यांनी हातातले पलिते वर धरताच पंधराजण धावत आले. त्यांनी त्यांचं सूक्ष्म निरीक्षण केलं.

‘‘चलारे. किल्ल्याचा महादरवाजा उघडून दुष्मनाला आत घेण्यापूर्वी निकमांना पकडून ठेवा.’’

‘‘जी हाँ.’’

ते सर्व सैनिकांसह पळत गेले. रामरावाच्या आरडा-ओरड्याला न जुमानता त्याला पकडलं. त्यांना तो हिसडत म्हणाला,

‘‘कुणाची माय व्याली रं मला पकडायला? शिंच्यानो.’’

‘‘रामराव, शिव्या द्यायचं काम नाही.’’

‘‘तू कोन हायेस, मला जरबेत बोलणारा?’’

‘‘मी कान्होजी आंग्रे... तुकोजी संकपाळाचा ल्येक.’’

‘‘चार तुकडं मिळाय लागल्यावर, लय शाना झालस व्हयरे तू.’’
‘‘रामराव, वाकडं बोलायचं काम नाही.’’
‘‘मग काय!! ... सलाम करू!! ... का आरती करू?’’ रामरावनं दरडावून विचारलं.
‘‘तुम्हाला दोन्ही करावी लागतील रामराव!’’
‘‘माझं खेटर करीऽऽल.’’ दातओठचावत, डोळे वटारत तो बोलला.
त्याची बडबड ऐकून, कान्होजीचा राग उफाळला. त्यांच्या मुठी वळल्या. ते ओरडले.
‘‘बस झालं, खूप ऐकून घेतलं. आता चला किल्लेदारासमोर.’’
‘‘कुणापुढं म्हणालास?’’
‘‘किल्लेदार अचलोजी मोहितेकडे.’’
‘‘अचलोजी मोहित्या! छे:-छे: त्या कुत्र्याकडं मी साफ येणार नाही.’’
‘‘का?’’
‘‘कारण यापुढं त्याच्याकडे किल्लेदारी रहाणार नाही.’’
‘‘मग किल्लेदार कोण?’’
‘‘आम्ही, ... रामराव निकम.’’
‘‘म्हणजे उद्यापासून पहिला मुजरा तुम्हालाच का?’’
‘‘बिलकुल! त्या थेरड्या अचलोजीचा अधिकार आज संपलाच म्हणून समज! परंतु कान्होजी, तू मला थोडीशी मदत केलीस, तर तू मनसबदार होशील.’’
‘‘यांचं उत्तर मी उद्या देईन. आता चला किल्लेदाराकडे.’’
‘‘आम्ही बिलकुल येणार नाही.’’
‘‘मग तुम्हाला जेरबंद करून नेणं प्राप्त आहे रामराव.’’
‘‘म्हणजे आम्ही कैदी की काय?’’
‘‘होय रामराव.’’
‘‘कोणता अपराध ते तरी सांग.’’ तो उपहासानं हसत सुटला.
‘‘विजापूरकरांना पाठविलेले हे खत कोणाचे?’’
स्वत:च्या अक्षरातलं ते पत्र पाहून तो दिङ्मूढ झाला. त्याच्या तोंडाला खीळ बसली. तो कान्होजीच्या मागून चालू लागला. त्यांनी त्याला अचलोजीच्या समोर उभा केला. त्याला पहाताच किल्लेदाराच्या मुखावर साक्षात सूड उभा राहिला. पलित्यांच्या मंद प्रकाशात त्याच्याकडे जळजळीत नजर फेकीत त्यांनी मिशीला पीळ भरला.
‘‘रामराव, निमकहरामी चांगली नाही. फार दिवस चैन केलीस. त्याबद्दल योग्य बक्षीस घेऊन स्वस्थ बस.’’
रामराव समजला. पुढच्या काळ्या भविष्याची त्यला निश्चित कल्पना आली. त्यातून सुटण्याचा एकही मार्ग दिसत नव्हता, तेव्हा तो स्वत:ची पर्वा न करता किल्लेदाराकडं पाहून तिरस्कारानं हसत राहिला. क्षणभरात स्वत:ला आवरलं.
‘‘अचलोजी, आज आम्ही, उद्या तीच पाळी तुझ्यावर.’’
‘‘काय म्हणायचंय तुला?’’
‘‘तू सिद्धीसातशी जोडलेले संबंध आम्हाला ठाऊक आहेत.’’
रामरावला अचलोजीने तुरुंगात टाकले
‘‘हट् तेरे की, ... कान्होजी, या गधड्याला अंधारकोठडीत रवाना करा. कुत्र्याच्या मोलानं मरू दे.’’
‘‘जी सरकार.’’

कान्होजींनी इशारा करताच सैनिक त्याला घेऊन गेले.

दुसऱ्या दिवशी उगवत्या सूर्याला साक्षी ठेवून कान्होजी बाहेरच्या इस्लामी फौजांवर तुटून पडला. घनघोर युद्धाला सुरूवात झाली. ''तोबाऽऽ तोबाऽऽ, हाय अल्ला'' अशा करुण पुकारांनी वातावरण कुंद झालं. त्याचबरोबर हरहर महादेव - हरहर महादेव या उत्साही घोषणा ऐकून सागराला आनंदाची भरती आली. तटाखालचे बेसावध इस्लामी सैनिक बाणकोट-खेडकडे जीव घेऊन पळत सुटले. शस्त्रास्त्रं, घोडे, धन-दौलत टाकून ते निघून गेले होते. कान्होजीला ते दृश्य पाहून फार गंमत वाटली. त्यानं आपल्या आरमारी सैनिकांना ती लूट आणण्याचा हुकुम दिला.

सैनिकांनी सगळी लूट आणून रचून ठेवली. ते अलोट सामान पाहून अचलोजी आनंदानं हसला. त्याच्या डोळ्यांत वेगळीच चमक दिसली. मनात काहीतरी विचार करीत कान्होजीनं विचारलं.

''सरकार, आपला मार्ग बिनधोक झाला ना?''

''बिलकुल! कान्होजी प्रथमच बलाढ्य दुष्मनावर हमला करून इतकं यश मिळवलंत की काय बोलावं तेच समजंत नाही. शाब्बास तुमची.''

* * *

मराठ्यांच्या मुल्कात येऊन धुमाकूळ घालणाऱ्या हबश्यांना आता कान्होजीचं भय वाटू लागलं. त्यांचं नुकसानही होऊ लागलं. त्यामुळं सिद्दीसात चवताळला. त्याच्या सर्व बेतांवर कान्होजी पाणी ओतत असल्यामुळं त्याचा काटा काढण्यासाठी तो युक्त्या शोधू लागला. पुष्कळ विचारकरून त्यानं त्याचा नायनाट करण्यासाठी कुलीखानाला पाठवला. कान्होजीला पकडून सिद्धीसातसमोर उभा करण्याचा निश्चय करून दर्याखानासमवेत तो निघाला. हर्णेच्या सीमेवर स्वत: राहून त्यानं पन्नास-साठ हबश्यांना सूचना देऊन कान्होजीच्या पारिपत्यासाठी पाठवलं.

अमावास्या असल्यामुळे गडद काळोख पसरला होता. निळ्या आकाशात अगदी थोड्या चांदण्या लुकलुकत होत्या. रातकिड्यांचा किर्रर आवाज भयानक वाटत होता. मधूनच वटवाघुळांचा चित्कार अंधाराला कापीत पुढं सरके तेव्हा सागराच्या लाटाही भयानं थरथरत असत. अशा रात्रीही कान्होजी बुरुजावर उभे होते. समुद्रातून आपल्या दिशेला येत असणारं होडगं दत्ताजीनं हेरलं. त्यानं कमरेचा शेला घट्ट आवळून बांधला.

''दादा, यातले हबशी नक्कीच गावतील. ते येईपर्यंत आपण दडून बसू.''

''दत्ता, ते दिसू लागले की आम्ही त्यांना दगड-धोंड्यांनी ठेचून जेरीस आणतो. मग तू त्यांची मुंडकी उडव.''

''मानाजी, तू अगदी आमच्या मनचंच बोललास.''

कान्होजींनी त्याच्या खांद्यावर थोपटून शाबासकी दिली. आपल्याबरोबर असलेल्या सर्वांना योग्य सूचना देऊन ते वाट पाहू लागले. ते होडगं त्यांच्या कक्षेत एका खडकाजवळ येताच ते दहा-पंधरा जण पुढं जाऊन दगडांचा वर्षाव करू लागले. हबशी चिडून त्यांना शिव्या देऊ लागले. तरीही दगडांचा मारा चालूच राहिला. मग ते तलवारी उपसून लढण्यासाठी तयार झाले. कान्होजींना योग्य संधी मिळाली. ते नावेत बसून समुद्रात गेले. हरहर महादेव, हरहर महादेव अशा घोषणा देत ते पंधरा-वीस जण त्या हबश्यांवर तुटून पडले. हा अनपेक्षित हल्ला असल्यामुळं ते बावरले. त्यांना पळूनही जाता येईना, तेव्हा ते सर्वजण त्यांच्या स्वाधीन झाले. हबश्यांच्या हातांना जाड काठ्या बांधून आग लावली. ते अक्षरश: थयथय नाचू लागले. कान्होजीनं इशारा करताच दत्ताजीनं काळ्याकभिन्न गलेलठ्ठ हबश्यांची मुंडकी उडवली. पहाट

झाली असल्याचा त्यांनी अंदाज केला. आसपास सिद्दीचे लोक लपलेले असावेत, ते एकदम येऊन आपल्याला जीवे मारतील असा विचार करून कान्होजींनी दत्ताजीसह सावित्री नदीत उडी घेतली. बाकीच्यांना लपत-छपत दुर्गावर जाण्याचा त्यांनी आदेश दिला. नदीत पाणी खूपच होतं. दोघंही हात मारून पाणी कापीत आपला मार्ग काढीत होते. ताज्या दमानं आलेल्या हबश्यांच्या तुकडीनं पगारात बसून त्यांचा पाठलाग सुरू केला. रात्र पडली. काजळी अंधार पसरलेला आणि तुडुंब भरलेल्या सावित्रीतून जाताना त्यांना ब्रह्मांड आठवलं. दर्याखान घाबरून गेला. अल्लाची करुणा भाकून कुराणातले आयते पुटपुटू लागला. थोड्या वेळानं उत्तरला.

''वो बेवकूफ यहीं मिलेगा. पगारमेंसे उतरकर देखना चाहिए.''

''जी हाँ.''

''नीचे उतरो और जंगल छान डालो.''

दर्याखान सशस्त्र सैनिकांसह उतरून चालू लागला. चालताना चहूंकडे नजर फेकीत ते चालत होते. त्यांना कान्होजी कसे दिसणार? दत्ताजीसमवेत ते घोड्यावरून दौडत होते. वराठी, चिंबवे, भावे ही गावं मागं पडली. रात्रीच्या छाया पसरताच त्यांनी हातातला ''कायजा'' ओढला. चौखुर उधळणारे घोडे थांबले. संबंध दिवसात त्यांना विश्रांती नव्हती, पाणीही मिळालं नव्हतं,हे जाणून ते दोघंही घोड्यांना घेऊन एका तळ्यावर गेले. तिथं त्यांना पाणी पाजून झाल्यानंतर एका झाडाखाली थोडा वेळ झोपण्याचा ते विचार करीत असतानाच दूरवरचा पलित्यांचा प्रकाश त्यांच्या नजरेत आला. ताबडतोब त्यांनी घोड्यांवर मांड घेतली. वायुवेगानं ते पळू लागले.

दुपार झाली, ते कुंबळ्यात आले. एका झाडाखाली म्हातारा अहंमद चिलीम ओढीत बसला होता. त्यानं त्यांना ओळखलं. कान्होजींनी याला सर्व हकीगत सांगताच त्यानं जाण्याची योग्य वाटत दाखवली. थोड्या वेळानं तो मशिदीच्या दारात येऊन बसला. आता दुपार अधिकच टणक झाली होती. डोकं तापंत होतं. खाली पुळणीच्या धगेनं पाय पुढं टाकवंत नव्हते, तरीही ते चालंत-चालंत कुंबळ्याच्या मशिदीजवळ आले. म्हातारा अहंमद तिथंच बसला होता. त्यानं झनपटंत उठून दर्याखानाला सलाम केला.

''पानीवानी पिओगे?''

''हाँ. ले आव.''

त्यानं उठून जवळच असणाऱ्या आपल्या घरातून पाणी आणून दिलं. दर्याखानानं त्याच्याकडे रोखून पहात विचारलं.

''क्यूंरे यहाँसे कोई काला कलूटा आदमी गयेला तुमने देखा?''

''हाँ हाँ, क्यूं नहीं? एक काला आदमी इस बाजू गया, अभीच गया वो.''

दर्याखान उत्साहानं अहंमदनं दाखवलेल्या मार्गानं जाऊ लागताच तो स्वत:शी हसला.

रात्रीच्या छाया येऊ लागल्या. सारख्या घोडदौडीमुळं अतिशय दमलेले कान्होजी, दत्ताजी पाणी मागण्यासाठी एका लहानशा घरासमोर उभे राहिले. फकी महंमद तंबाकू-चुना हातावर चोळीत बसला होता. कान्होजी जरा सुखावले.

''फकी, पहचाना क्या?''

''हाँ-हाँ, हमारे भाँजे हसन के दोस्त, यहाँ कैसे आए?''

''मामा, हबशी दर्याखाँन पीछेसे आ रहा है. हमको कहींभी छिपा रखो.''

''कान्होजी, तुम ठहरो, दत्ताजी, तुम जाके घासके नीचे पडे रहो.''

फकी घरात गेला. त्यानं कान्होजीबद्दल सांगून आईला विचारलं.

''अम्मी, इसको कहाँ छिपा दूँ?''

“तोबा-तोबाऽ, कैसे कहूँ फकी? लेकिन सिर्फ एक जगह है.” त्याच्या आईनं तोंडावर हात ठेवला.

“कौनसी बतावो तो.”

“अरे, शमशी के खाटपे सोनेको कहना.”

फकीनं बाहेर जाऊन त्यांना सर्व कल्पना दिली. त्यांचा रुकार मिळताच आत आणून बाजल्यावर झोपवलं. त्यांच्याजवळ आठ-नऊ दिवसांचं आपल्या मुलीचं मूल ठेवलं. त्यांच्या अंगावर पांघरूण टाकून त्यानं अभिमानानं पाहिलं.

“बेटा कान्होजी, कुछ गडबड हुई तो इस बच्चे को सला दो.”

“शुक्रिया फकी मामा.”

“अब बोलना नही, ठीक तरहसे सो जाओ.”

फकी बाहेर येऊन दरवाजात गुडगुडी ओढत बसला. थोड्या वेळानं तोंडातून धूर सोडीत त्यानं गुडगुडी ठेवली आणि तो कुराणातले आयते म्हणू लागला. ओटीवरचा दिवा मिणमिणत होता. बाकी सर्वत्र चिडिचूप अंधार होता. गावचा पाटील हातात चूड घेऊन त्याच्या अंगणात आला. हातातली चूड वर करून त्या प्रकाशात त्यानं फकीकडं पाहून घेतलं.

“क्यूँरे फकी, यहाँ से कोई आदमी गया क्या?”

“नहीं बा, आदमी तो कालिख में भी दीख पडेगा ना? कौन था वो? इतनी चौकशी क्यूँ?”

“अरे, वो हिंदू है, कान्हो आंगरा. उसका पीछा करनेवाले आए है और वे तुम्हारे घरमे भी देखेंगे.”

“आने दो, आनेवालेको कौन रोकेगा? लेकिन हम इस्लामी है. हमारे घरमे काफीर कैसे आएगा?”

फकीनं बारीक नजरेनं पाटलाच्या चेहऱ्याकडं नजर टाकून गुडगुडी त्याच्या हाती दिली. या तुडील गावात फकी प्रतिष्ठित गृहस्थ होता. त्याला गावात चांगलाच मान होता. त्यामुळं पाटलाचा त्याच्यावर विश्वास बसला. परंतु सिद्दीसातचे सैनिक धावत येत असल्याचं पाहून तो घाबरला. गुडगुडी खाली ठेवीत तो थरथत बोलला.

“खाँसाहब, हमने देखा है. इसके घरमे कोई नहीं.”

“फिरभी हम देखनेवाले है.”

“तो ठीक है. घर तुम लोगोंका है तुम तला करो.”

बाहेर जारजोरात चालत असलेलं बोलणं ऐकून कान्होजी समजले. हृदयात धडधडलं. त्यांनी ब्रम्हेंद्रस्वामींचं स्मरण केलं. जिवावर उदार होऊन त्यांनी जवळच्या मुलाला चिमटा काढला. पोर कळवळून रडू लागले. सैनिकांनी खोलीच्या बंद दाराकडं पाहिलं.

“किसका बच्चा रो रहा है?”

“मेरी बहूका. वही अंदर है.”

“इस घरमें नहीं. साले कुत्तेको पकडना कठिन हुआ है. चलो.”

ते आले तसेच निघून गेले. फकीनं अल्लाची दुवा मागून पुढचा दरवाजा बंद केला. आत येऊन त्यानं ती खोली उघडली.

“कान्होजी बाहर आओ बेटा.”

कान्होजीनं बाहेर येऊन मुक्तीचा निश्वास टाकला; अन् गोठ्याजवळ जाऊन त्यानी दत्ताजीलाही बाहेर काढलं.

फकीनं त्या दोघांच्या पाठीवर अतिशय प्रेमानं थोपटलं. दोघांचं कौतुक करीत तो म्हणाला,

“कान्होजी तुम चार दिन यही रहो. कल जाओगे तो इनकी पकडाइमें आवोगे.”

“मामा तुम्हारा कहना हमको मंजूर है.”
फकीनं खरोखरच मामाचं नातं अगदी खरं केलं. चार दिवसांनी कान्होजींनी त्याचा निरोप घेतला. तेव्हा खरोखरच त्यांच्या नेत्रांत कृतज्ञेतेचे अश्रू होते. आवाजही सद्गदित झाला होता.
कान्होजी-दत्ताजीचे अश्व वाऱ्यासारखे पळू लागले. रस्त्यातच त्यांना मानाजी सैनिकांसह येताना दिसला. कान्होजीनं थांबून मानाजीला सर्व परिस्थितीची कल्पना दिली. आता ते सगळेच निघाले. वाटेत ते टोळ गावात थांबले. एका विहिरीवर पाणी पीत असताना नांदवीच्या ठाणेदारानं त्यांना पाहून कैद करण्याचा हुकुम दिला. थोड्याच वेळात साखळदंडानी जखडलेले कान्होजी आपल्या सहकाऱ्यांसमवेत ठाणेदारासमोर उभे राहिले. त्यांच्याकडे पहात तो मिळणाऱ्या बक्षिसाबद्दल विचार करू लागला.
“क्यू बे, तुम कानोजी आंगरे कहाँ जा रहे हो?”
“अपने ... देश की ओर.”
“देस का नाम छोडो, अब अंधेर कोठरीमें जाकर मजा करो. अशरफ इनको मरोलेमें ले जाव.”
“जो हुक्म.”
कान्होजीसह सर्वांना घेऊन सैनिक चालू लागले. सबंध दिवस डोक्यावर उन्हाचा मारा आणि पोटात अन्न नसल्यामुळे ते फार फार थकले होते. रात्र होताच थंडीही वाढू लागली. त्यामुळे कान्होजींना जबरदस्त नीज येऊ लागली. ते जमिनीवर पडले, तिथंच झोपी गेले. क्षणभरात ठाणेदाराच्या पाहारेदारांनी “परसा” पेटवल्या. या सर्वांना मध्ये ठेवून ते सभोवार झोपले. शेकोट्या पेटत होत्या. वातावरणात उबही आली होती. पाहारेदार स्वस्थ झोपले होते. कान्होजीना जाग आली. त्यांनी पाय हलवला. पायात असलेल्या खोड्यामुळं ते पाय जड झाले होते. त्यांनी प्रयत्न करून पाय शेकोटीच्या जाळावर धरले. खोड्याच्या फळ्या पेटल्या. साखळ्याही तुटल्या. सरकत जाऊन त्यानी दत्ताजी, मानाजी, हरजी वगैरेच्या साखळ्या कापून खोडे शेकोट्यात टाकले. ज्वाळा उंचावू लागल्या. पहरेदार चांगलेच घोरत असल्याचं पाहून ते आंबवे गावाकडे निघाले. कान्होजीचे दोन्ही पाय चांगलेच पोळल्यामुळं त्यांना चालता येत नव्हतं. पायातल्या वेदना मस्तकापर्यंत पोचत होत्या. परंतु त्याच्या मुखातून “हाय” निघाला नाही. डोळ्यांत पाणी आलं नाही.
“दत्ता, आंबवेत जाऊन शिवा सावंतांच्या होडग्यातून सुवर्ण दुर्गाकडे जाऊ.”
“हो, परंतु दादा तुझे पाय किती पोळलेत ते बघ तरी. त्याला ओशाडीचा पाला बांधून मग होडग्यात बसू.”
कान्होजी काहीही न बोलता फक्त हसले. हाच त्यांचा होकार जाणून दत्ताजीनं चहूंकडे नजर फेकली. पांढरी इवलाली फुलं घेऊन ओशाडी उभी होती. मानाजी पुढं गेले. त्यांनी बरीच ओशाडी उपटून आणली. त्याची माती अलग करून ती दगडाखाली ठेचली. चांगला हिरवागार ओलसर ठेचा वडाच्या पानांवर ठेवून त्यावर कान्होजीचे पाय बांधले तो ओशाडीचा थंडगार स्पर्श त्यांना सुखद वाटला त्यांना आळीपाळीनं पाठीवर घेऊन ते शिवा सावंताच्या घराकडे निघाले.

* * *

अचलोजी मोहिते पत्नीनं दिलेला विडा घेऊन पुढच्या दालनात आले. सागुती असल्यामुळे त्यांनी आकंठ भोजन केले होते. भोजनोत्तर पानाचा तोबरा भरून ते शतपावली करीत होते. खलिता घेऊन दत्ताजी आत आला. मुजरा करून उभा राहिला. अचलोजींनी त्याच्याकडे जरा कुर्ऱ्यांतच पाहिले. तोंडातल्या लालबुंद थुंकीची पिचकारी मारीत त्यांनी बोबड्या स्वरात

विचारलं.
"काय आहे रे?"
"महाराजांचा खलिता."
"वाचून सांग."
मखमली थैलीचा सरफास सैल करून दत्ताजीनं पत्र बाहेर काढलं. त्यावर त्यानं नजर फिरवली.
"महाराजांनी आपल्याला बोलावलंय."
"जाऊ. त्यात काय? सैनिकांस तयार रहायला सांग."
"जी सरकार."
सुवर्ण दुर्गाच्या दैनंदिन कारभाराची व्यवस्था करून अचलोजी फौजेसह निघाले. यावेळी त्यांनी कान्होजीला, अन् दत्ताजीला सुद्धा बरोबर घेतलं. घाटमाथ्यावरचा प्रदेश कान्होजीला अपरिचित असल्यामुळं त्याला हवा पाणी, वृक्षवेली आणि माणसांची बोलीभाषा खूपच वेगळी वाटली. घाटी सैनिकांच्या शब्दांची त्यानी नक्कलही केली. साताऱ्यात ते प्रवेशले. तेव्हा सूर्य अस्ताला गेला होता. त्याच रात्री महाराजांच्या दर्शनाला जाणं आवश्यक असल्यामुळं ताबडतोब राहुट्या उभारण्याची अचलोजींनी आज्ञा केली. काही मंडळी अजून मागं राहिल्यामुळं त्यांनी खूप विचार केला. त्यांना कल्पना सुचली.
"कान्होजी तुम्ही याल का मशाल घेऊन वाड्यावर?"
"होऽऽ अगदी आनंदानं!"
त्यांना महाराजांना पाहण्याची जबरदस्त इच्छा होती. आज ती पुरी होण्याची संधी मिळत्ये हे पाहून त्यांना खूप खूप आनंद झाला. मनांतल्या मनात महाराजांचं चित्रं तयार करीत ते अचलोजी बरोबर निघाले. वाड्यात प्रवेश केल्यावर दिवटीला रजा देऊन ते कान्होजीसह महाराजांच्या समोर आले. त्रिवार मुजरा करून ते नम्रतेनं उभे राहिले. कान्होजी महाराजांकडे अत्यंत उत्सुकतेनं पहात होते. महाराजांची नजरही त्यांच्या मुखावर स्थिरावली. काळासावळा तेजस्वी राकट चेहरा, हनुवटीला असलेली लहानशी दाढी, ओठावर उभी राहिलेली काळी रेघ, विलक्षण तेजस्वी डोळे आणि कपाळावर दिसणारी राजचिन्हं राजाराम महाराजांच्या नजरेत भरली. सुभेदाराचा आणि कान्होजीचा मुजरा स्वीकारीत त्यांनी विचारलं.
"हा मशालजी तुम्ही कुठून आणला?"
अचलोजींना महाराजांच्या प्रश्नाचं जरा नवलच वाटलं. काय उत्तर द्यावं हेच त्यांना सुचेना. क्षणभर ते स्तब्ध राहिले.
"अचलोजी, सत्य सांगा, भुलावण करू नका."
"महाराज, माझे मशालजी मागं राहिलेत, म्हणून ह्या खासगीतल्या माणसास राजी करून आणलंय."
"सुभेदार, हा मुलगा सागर किनाऱ्यावरच्या आमच्या राज्याचा "मोहरा" ठरणार यात शक नाही. याला हलकं काम देऊ नका. त्याच्यावर हळुहळू जिम्मेदारी टाकून परीक्षा घ्या."
"आज्ञा महाराज."
"मुला नाव काय तुझं?"
"कान्होजी आंग्रे."
"दिल्हे काम करशील?"
"जी हाँ."
"अचलोजी, याचा रोजमुर्रा वाढवा. मुलगा मोठा बाणेदार दिसतोय. त्याच्याबद्दल आम्हाला

खूप विश्वास वाटतो. महाराजांचे गंभीर शांत बोल ऐकून कान्होजीचं मन आनंदानं नाचू लागलं. त्यांनी पुढं होऊन महाराजांस मुजरा घातला. राजराममहाराजांचा हात त्याच्या पाठीवरून फिरला. त्यानी मान वर करून पाहिलं तेव्हा एक तेजस्वी स्त्री येऊन महाराजांच्या आसनाजवळ उभी राहिली. ती राणी असावी असा विचार करून कान्होजीनं तिच्या पायावर मस्तक ठेवलं. राणीनं त्याच्याकडे स्थिर नजरेनं पाहिलं.

"यशवंत हो बेटा."

"राणीसाहेबांनी या मुलास पोषाख द्यावा."

"ताराऊराणीसाहेबांच्या मुद्रेवर स्मितरेखा फाकली. त्यांचं मनोगतच जणू राजाराममहाराजांच्या मुखातून बाहेर पडलं. राणीसाहेबांनी इशारा केला. एक सेवक चांदीचं तबक घेऊन आला. छताच्या झुंबरातून खाली येणाऱ्या प्रकाशकिरणात ते चमकू लागलं. महाराजांनी त्या तबकातला डगला आणि पागोटं स्वहस्ते कान्होजीला दिलं. त्यांनी ते दोन्ही कपाळाला लावून अंगावर घातलं. महाराजांचे नेत्र अचलोजीकडे वळले.

"अचलोजी तुमच्याकडच्या वसुलीचा भरणा नीट होत नसल्याची तक्रार आहे. त्याचप्रमाणं सिद्दीसातच्या बळजोरीचा तुम्ही योग्य प्रतिकार करीत नसल्याचं आमच्या कानी आलं आहे. तो आमच्या दुर्गाचा कर्दनकाळ ठरेल असं वाटतं. आता तुम्ही ह्याला बरोबर घेऊन कारभार करा. हा तुमच्या उपयोगी पडेल असा आमचा होरा आहे."

"आपल्या मर्जीप्रमाणे निभावेन महाराज."

"ठीक आहे, कान्होजीला ठेवून जा. तुमच्या डेऱ्यात पोचविण्याचा आम्ही इंतजाम करू."

महाराजांची इच्छा ऐकताच अचलोजीला बरं वाटलं नाही. परंतु ती राजाची आज्ञा होती. तिचं पालन करणं त्यांचं कर्तव्य होतं. ती उल्लंघिण्याचं त्यांना धैर्य नव्हतं. अचलोजी मान खाली घालून निघून गेले.

अचलोजी निघून गेल्यावर कान्होजीला जवळ बसवून ते बोलू लागले.

"कान्होजी हे राज्य सर्वांचं आहे. स्वार्थ लोभ ठेवून काम करणाऱ्याचा मुलाहिजा ठेवला जाणार नाही. दुष्मनाला शामिल होऊन किंवा त्याच्याशी तात्पुरती हातमिळवणीकरून सल्तनतीला धोखा देणाऱ्यांचा नि:पात करणं तुझं कर्तव्य आहे. ईश्वर तुझ्या सतत पाठीशी राहील. तू तशी शपथ घ्यावीस असं आम्हांस वाटतं."

महाराजांचे शब्द ऐकून कान्होजीना स्वप्नात असल्यासारखं वाटलं. त्यांनी स्वत:ला चिमटा घेऊन खात्री करून घेतली. ते तुरन्त पुढे झाले. महाराजांच्या पायाची धूळ मस्तकी घेऊन त्यांनी शपथही घेतली. महाराज उठले, तेव्हा बरीच रात्र झाली होती. बरोबर माणसं देऊन त्यांनी कान्होजीला डेऱ्याजवळ पोचविण्याची व्यवस्था केली.

* * *

दोन-अडीच वर्षात कान्होजी तरणेबांड दिसू लागले. महाराजांनी त्यांच्यातल्या साहसाला आव्हान देऊन, त्याचं इतरांपेक्षा वेगळं व्यक्तिमत्त्व बनवलं. सुवर्णदुर्गातलं त्यांचं प्रस्थही वाढू लागलं. तरुणवर्ग त्यांच्याकडे आकर्षित झाला. ते सर्वत्र कावळ्याची नजर ठेवून, पालीच्या कानांनी ऐकू लागले, तेव्हा अचलोजीची काळी कृत्यं त्यांच्या ध्यानी येऊ लागली.

ज्येष्ठ महिन्यातली एकादशी होती. कान्होजीचा उपवास असल्यामुळं, मुगडाळीच कढण पिऊन ते सहज सुवर्ण दुर्गाच्या पाणकळी बुरुजावर उभे राहून समुद्राची गंमत पहात होते. मध्यरात्र झाली असावी. समुद्र भरतीच्या नादात उचंबळत होता एक गुरबा थांबला. अचलोजी चोरवाटेनं खाली गेले. नाखुदाही पुढं आला. त्यानं एक थैली अचलोजीच्या हाती दिली. अचलोजी दबत्या

पाऊलांनी त्याचवाटेनं आपल्या घरात गेलेले कान्होजीनी पाहिलं. यावेळी त्यांना ब्रम्हेंद्रस्वामीचे शब्द ऐकू आले. ते विस्मयकारक मनानं घराकडे वळले.

सकाळ झाली. कान्होजी निर्विकार मुद्रेनं अचलोजीसमोर आले. त्यांनी रिवाजाप्रमाणे मुजरा केला. ते तिथेच उभे असताना, दहाबारा सैनिक येऊन उभे राहिले. अचलोजींनी त्यांच्याकडे रागाने पाहिले.

''काय आहे रे? इतक्या सकाळी कशापायी आलात?''

त्यातल्या म्होरक्यानं आपल्या सहकाऱ्यांची नजरेनंच अनुमती घेतली. तो जरासा पुढं झाला.

''सरकार, आपली मानसं शिद्दीच्या मुलुखात लूटमार करतात, ती खजिन्यात जमा न करता, स्वत:च ठेवतात.''

''आम्हाला याची कल्पनाच नव्हती. असा कोणी असेल, तर त्याला दुर्गाबुरुजावरून ढकलून द्यायचं!''

''मग सरकार,ती सजा प्रथम आपल्यालाच भोगावी लागेल.''

कान्होजीचे कठोर शब्द आणि तीक्ष्ण नजर पाहून अचलोजी मनात घाबरले. त्यांना घामही फुटला. परंतु तसं न दाखवता ते सैनिकांवर चिडले. त्यांना दूषणं देऊ लागले. कान्होजीनी ही परिस्थिती जाणली, यावेळी एवढीच सूचना पुरेशी आहे; असा विचार करून ते सैनिकांबरोबरच बाहेर पडले.

* * *

सरकत्या दिवसाबरोबर कान्होजींची उत्सुकता वाढू लागली. अचलोजी मात्र अत्यंत सावधानीनं वागत होते. त्यामुळं कान्होजीना संधी मिळणं दुरापास्त झालं. मधल्या काळात ते ब्रह्मेंद्रस्वामींना भेटून आले. त्यांनी सांगितलेल्या दिवशी ते अचलोजीच्या दर्शनाला गेले. त्यांना पाहून अचलोजीच्या मनात धडकलं. स्वत:ला त्यांनी सावरलं.

''कान्होजी, सध्या तुझं कामात लक्ष नाही असं आमच्या कानी आलंय.''

''सरकार, तसे असेल तर सजा भोगायला मी तयार आहे. त्यापूर्वी सांगा की मला न पुसता, आपण आदिलशाहाला जबाब का धाडिला?

''आम्ही किल्लेदार आहोत. आमच्या मनास वाट्टेल ते आम्ही लिहू. तू कोण पुसणार?''

''महाराजांच्या आज्ञेवरून मी विचारलं.''

उद्धट अचलोजीनं महाराजांना शिवी हासडताच कान्होजी रागानं लाल झाले. त्यांया गलमिशा कंपित झाल्या.

''मी कोण ते आपल्याला लवकरच समजेल.''

अचलोजीचं शरीर क्रोधानं पेटलं. समोरच्या पोराला चुरडून फेकून देण्याची इच्छा झाली. ते बेभान होऊन किंचाळले.

''हरामखोर, तुझ्या बेमुर्वतीला योग्य सजा मिळालीच पाहिजे. कोण आहे रे तिकडे? ... याला गिरफ्तार करा.''

''परंतु काही सैनिक पुढं आला नाही... ते पुन: ओरडले. परंतु पुन्हा कोणीही पुढं सरकलं नाही. त्यामुळे ते मनातून खूप धास्तावले. कान्होजी मात्र समाधानानं हळूच हसले. त्यांनी आपला उजवा हात वर केला.

''मानाजी, सिदाजी, किल्लेदारांना विश्राममहालाकडे घेऊन जा. त्यांना विश्रांतीची जरुरी आहे.''

''ते दोघंही धावत आलेले पाहून अचलोजी चकित झाले. त्यांना आपल्या परिस्थितीची जाणीव

झाली. त्यांनी विचारलं...
"नाईकजी पांढरे कुठं आहेत?"
"अंधार कोठडीत."
"कुणाच्या हुकुमानं? का टाकलं तुरुंगात?"
"आम्ही त्याला लाच घेताना पकडून तुरुंगात टाकलंय."
तू कोण?"
"आम्ही दुय्यम किल्लेदार."
"नेमणूक कोणी केली तुझी?"
"ताराऊराणीसाहेबांचं फर्मान आहे."
"त्यावरचं दस्तखत?"
"रामचंद्र निळंकठ."
"आमच्या नकळत तुला देण्यात मतलब?"
"किल्लेदार, तुम्ही हरामखोरी करून, दुष्मनाशी हातमिळवणी केली, हेच त्याचं कारण!"
"खामोश, तू नराधम..."
"अचलोजी, चिडू नका. मी अगदी खरं बोलतोय."
"काय खरं?"
"सांगू का? नीट ध्यान देऊन ऐका. अचलोजी, परवा आपल्याकडे, सिद्दीयाकुतखानाचे वकील विश्वासराव रणदिवे यांनी पाहुणचार घेतला हे खरं आहे का?"
"होय, त्यात तुझा काय संबंध?"
"आमचा निकट संबंध आहे अचलोजी!! तो सगळा पुरावा आमच्यापाशी आहे. योग्य समयी सादर करू."
विश्वासरावांच्या संगतीत घालवलेली रात्र, आणि केलेले करार आठवून, ते कान्होजीसमोर ओशाळले. कान्हाजीला त्यांच्या मनातली खळबळ समजली. यावेळीच यांचा संभावितपणाचा बुरखा फाडण्याचा त्यांनी विचार केला.
"किल्लेदार, तुम्ही आम्हाला तळघराकडे नेऊन तुमची संपत्ती दाखवा. टोळीतल्या माणसांची नावंही सांगा."
"नाही सांगितली तर तू काय करणार?" डोळ्यांतून आग ओकीत त्यांनी प्रश्न केला.
"आमच्याशी गाठ आहे अचलोजी."
कान्होजीच्या म्यानातली तलवार बाहेर पडली. यावेळी आपलं नेहमीचं वागणं योग्य ठरणार नसल्याचं जाणून, त्यांनी आपल्याला मदत करणाऱ्यांची नावं चटकन सांगून टाकली.
"चला, आता तळघरात."
अचलोजीना घेऊन ते तळघरात गेले. हिरे, मोती, सोनं, रेशमी कापड सगळं सगळं पाहून कान्होजी अवाक् झाले. त्यांनी अचलोजीच्या हातांत स्वत: बेड्या ठोकल्या.
"चला आता अंधारकोठडीत."
आपल्या संपत्तीकडे अश्रूपूर्ण नजरेनं पहात, ते अंधारकोठडीकडे निघाले. यावेळी त्यांची गर्दन शरमेनं झुकली होती. पायातलं बळही गेल्यासारखं वाटत होतं.
दुसऱ्या दिवशी प्रभातीच पूर्व दिशेला, लाल गोळा दिसू लागला. त्याला विशेष तेज असल्याचं कान्होजींच्या ध्यानी आलं. त्या सूर्याला नमस्कार करून ते घरात आले. बिंबाबाई त्यांच्या न्याहरीची तयारी करती होती. मातेला मुजरा करून, त्यांनी श्रीकृष्णपंतांना बुलावा धाडला. खांद्यावरचं उपरणं गळ्याभोवती ठेवीत पंत गडबडीनं आले.

“आपण माझी याद केली का?”
“होय, महाराजांसाठी खत तयार करा.”
“सांगावं.”
पंतांची लेखणी सरकू लागली. कागदावर सुंदर वळणदार अक्षरं उमटू लागली. शिक्कामोर्तब करून पंतांनी तो खलिता पाठवला. ते हातात खलिता घेऊन पुन्हा आल्याचं पाहून कान्होजींना आश्चर्य वाटलं.
“काय आहे पंत?”
“महाराजांचा खलिता आहे.”
“हे खलिते लपंडाव खेळले की काय? कान्होजी गंमतीनं हसत सुटले.”
पंतांनी थैलीचा सरफास ढिला करून महाराजांचे पत्र बाहेर काढलं. त्यांनी ते कान्होजी समोर धरलं, दरवाज्यातून आत येत असलेला दत्ताजी हसत सुटला. कान्होजी थोडंसं हसून उत्तरले.
“पंत, वाचा तो खलिता, अजूनही तुमचं बालपण संपलेलं दिसत नाही. त्यात कोषातून बाहेर पडा आता.”
पंत लाजले, त्यांचा चेहरा लालेलाल झाला. आपल्या मित्राकडे पहात त्यांनी स्वत:ला सावरलं, आणि ते महाराजांकडून आलेला खलिता वाचू लागले.
“आम्ही बहोत खुस जाहलो. तेव्हा वस्त्रे व सरखेलीचा खिताब देऊन, मुलुख स्वाधीन करोन ते ठिकाणचे मुखत्यार करोन गादी मसनद दिल्ही.”
“दादा, आता मात्र तुझं भाग्य उजळलं!”
दरवाज्यात उभी असलेली बिंबाबाई समोर पहात होती, आणि ऐकतही होती. तिचं मन आनंदानं भरून गेलं.
“कान्हा, जोशीबुवाचं भविष्य खरं ठरलं. सांगितल्याप्रमाणं त्यांचं इनाम ने रे बाबाऽऽ.”
“होय आये, त्यांचे शब्द आम्ही कधीच विसरणार नाही.”
“दादा, फकीमामाला सुद्धा काहीतरी इनाम द्यायला हवे.”
“दत्ताजी, आम्ही सरखेला आणि तुम्ही सुवर्णदुर्गाचे किल्लेदार झालात. आता फकीमामाला तुम्ही दिलंत तरी चालेल.”
आपल्या दादानं सांगितलेली शुभवार्ता ऐकून दत्ताजीला खूप आनंद झाला. बिंबाबाईचं मन तर खुशीनं नाचू लागलं.
“कान्हू, देवीच्या किरपेनं घर भरलं, आता एकच कर!”
“काय ते सांग.”
“लगीन!! आता नातवंडांना खेळवण्याची इच्छा हाये!!! ती पुरी कर.”
“थोडा दम खा, नाहीतर तू असं करीनास?”
“काय?”
“तू माझ्यासंगं स्वामीकडे चाल. त्यांना विचारूनच करू सारं.”
“नको रे बाबा, तूच इच्यारून ये.”

* * *

एका सुंदर प्रभाती कान्होजींनी “केसरी” वर मांड घेतली. त्या अबलख घोड्याच्या पाठीवर प्रेमानं थोपटीत ते म्हणाले.
“केसरी, मला लवकर लवकर ने, नाहीतर स्वामी रागावतील.”
केसरीनं आपल्या धन्याचे शब्द कानात साठवले. तो वाऱ्याबरोबर चौखुर उधळला. नेहमी

पाहिलेला चिपळूणचा डोंगराळ भाग, हिरव्यागार पाचूसारखी झाडी, नागमोडी वळणं घेत जाणाऱ्या वाटा आणि खळखळत जाणारं निर्मळ पाणी आज त्यांना वेगळंच जादूमय भासलं. सूर्याची किरणं प्रखर होऊ लागताच कान्होजी स्वामींच्या गवताच्या कुटीजवळ आले. पायउतार होऊन घोड्याला त्यांनी मोकळं केलं. पाय धुऊन त्यांनी एकाग्रतेनं झोपडीकडे पाहिले. तिथेच उभ्या असलेल्या झाडावरून पांढरं फूल खाली येताच ते आत प्रवेशले. समोर व्याघ्रासनावर बसलेल्या ब्रह्मेंद्रस्वामींसमोर श्रीफळ, विडा आणि दक्षिणेची थैली ठेवून नमस्कार केला. त्याला सविस्तर वृत्त विचारून ते समाधानानं हसले.

"कान्होजी आज तुला आम्ही वेगळाच चमत्कार दाखवतो."

त्यांनी हातातली काठी वाजवताच सिद्दी याकूबखान त्यांच्या समोर आला.त्यानं स्वामींना सलाम केला. तो अतिशय उंच, सावळ्या वर्णाचा धिप्पाड पुरुष होता. त्यांच्या डोळ्यात दिसणारी करुण याचना पाहून त्यांना आश्चर्य वाटलं.

"कान्होजी, मराठ्यांच्या मुलुखात धुमाकूळ घालणारे हेच ते सिद्धी."

कान्होजी चकित झाले, परंतु काही न बोलता उत्सुकतेनं ऐकू लागले.

"याकुबखाँ तुम्ही कशासाठी आलात?"

त्याच्यामागं उभा राहिलेला त्याचा जबाबदार कारभारी दाढी कुरवाळीत जरा सरकला.

"महाराज, इनका दामाद महंमद कही गूम हो गया, इनकी लाडली बेटी रो रही है."

"पुढं सांग."

"जिस जहाज के साथ वह गया था, वह डूब गया इसिलए हमारे सरकार परेशान है ।"

"शोध केला की नाही?"

"सब किया, मनौती, ज्योतिष भी हुआ, लेकिन कामयाबी नही मिली."

"याकुबखाँ, परशुरामाचं मंदिर बांधून देशील का?"

याकुतखानानं सिद्दीसातकडं पाहिलं. त्या दोघांच्या मनाला धर्माचा किडा पोखरू लागला. क्षणभर स्तब्धता पसरली. याकुबखानाची हालाल झाली. त्याचं लक्ष समोरच्या तेजस्वी मूर्तीकडे गेले. त्याच्या मनात विजेचा लखलखाट झाला, त्याचे हात जोडले गेले. सिद्धीसात मात्र दात-ओठ खात विचार करीत होता. याकूबखानाच्या मुखातून शब्द बाहेर पडले.

"स्वामीजी आपके मुताबिक करूँगा."

"ठीक आहे. येत्या शनिवारी तुझा जावई तुला भेटेल."

याकूबखानाचा चेहरा समाधानानं उजळला. तो त्यांच्यासमोर नम्र झाला. त्यांना जाण्याची आज्ञा होताच याकूबखान सिद्दीसातसह बाहेर पडला. ब्रह्मेंद्रस्वामींची तेजस्वी नजर कान्होजीच्या मुखावर स्थिरावली. ते जरा घाबरूनच गेले. त्यांनी हात जोडून मस्तक विनम्र केलं. स्वामींच्या मुखातून सागराचं गांभीर्य घेऊन शब्द बाहेर पडू लागले.

"कान्होजी... सागरावर तू कधी पराजित होणार नाहीस. भगवंत तुझ्या पाठीशी आहे. मात्र सुवर्णदुर्गावर न रहाता कुलाबी जा."

"आज्ञा महाराज."

कान्होजी श्रीगणेशाला नमस्कार करून बाहेर पडले. कमरेतला शेला सैल झाल्यासारखा वाटला.

तो आवळून त्यात तलवार व्यवस्थित बसवली. रिकिबीत पाय घालीत त्यांनी केसरीला थोपटलं.

"चल बेटा, आमची 'आये' वाट पहात असेल."

ते सुवर्णदुर्गावर आले तेव्हा रात्र झाली होती. घोडा मोतद्दाराच्या हाती सोपवून ते घरात आले.

वस्त्र बदलून त्यांनी स्नानही केलं. बिंबाबाईनं बोलावताच ते रांधपघरात आले. पाटाभोवती रांगोळी घालून गोडाधोडानं भरलेलं ताटं ठेवली होती तो थाट पाहून त्यांनी विचारलं.
"आयो आज कोणता सण केलास?"
"कान्हू तू सरखेल झालास म्हणून मी देवाला नैवेद्य केला होता."
"मला वाटलं माझ्या लग्नासाठी देवाला नवस केला असावा."
दोघंही मोकळेपणानं हसली. आज बिंबाबाईही पुत्राबरोबर भोजन करून लागली.
शुभ-मुहूर्तावर दत्ताजी सुवर्णदुर्गाचे किल्लेदार झाले. त्यांना सर्व कारभाराची संपूर्ण माहिती देऊन ते राजाज्ञेप्रमाणं निघाले. त्यांनी वडिलधाऱ्या माणसांना नमस्कार करून आशीर्वाद घेतले. लहानग्या कान्होला अंगाखांद्यावर खेळवणाऱ्या सुवर्णदुर्गाला त्याचा विरह फार जाणवला. सर्व सैनिकांसमवेत ते महाद्वाराशी आले. जहाज "नारायण" उभं होतं. मातेसह ते बसले. भरल्या नेत्रांनी सुवर्णदुर्गाकडं पाहून त्यानं मान वळविली.
उफाळत्या गार लहरींना मागं टाकीत "नारायण" पुढं जात होतं. ते जंजिरे-कुलाब्याच्या जवळ येताच सर्वांची धांदल उडाली. किल्लेदार भिवजी गुजर धावत-पळत आला. आपल्या धन्याला पाहून त्याला समाधान वाटलं तरीही खात्री करून घेण्यासाठी जहाजाजवळ जाऊन नम्रतेनं विचारलं.
"आपणच सरखेल कान्होजी आंग्रे?"
"होय."
तोफांची सलामी होताच ते महाद्वारातून आत गेले. मध्यभागी असलेल्या मंदिरात त्यांनी प्रवेश केला. जोगेश्वरीची सुवर्णमूर्ती उभी होती. तिथं फुलांचा आणि उदबत्त्यांचा मंद सुवास दरवळत होता. कान्होजींनी "मुहर" ठेवून नमस्कार केला.
भिवजी गुजरानं त्यांना निवासस्थान दाखवलं. त्यांना ते खूपच आवडलं. कुठंही उभं राहिलं तरी समोर अथांग सागर उचंबळलेला दिसत होता. भिवजी गुजरानं त्यांच्या भोजनाचा उत्तम इंतजाम केला. दुपारचे भोजन झाल्यावर कान्होजी म्हणाला.
"भिवजी, दरबारात सर्वांच्या साक्षीने आम्हाला सरखेलीची वस्त्रं देण्याचा इंतजाम करा."
"आज्ञा सरकार."
वाड्याच्या भव्य दालनाच्या भिंतींवर किनखापी पडदे शोभू लागले. त्यावर मण्यांच्या माळा सोडून नाजूक नक्षी केली होती. जमिनीवर इराणी गालिचे होते. पांढरी स्वच्छ बैठक पसरून त्यावर फुलदार गुलाबी लोडं होती. मध्यभागी कान्होजींचे आसन होते. जरीच्या फुलांनी शोभणाऱ्या रेशमी वस्त्राने आच्छादलेली ती मसनद अतिशय आकर्षक दिसत होती. गणेशचतुर्थीच्या दिवशी हा समारंभ व्हावा अशी स्वामींची इच्छा असल्यामुळे तोच दिवस निश्चित झाला.
कोंबड्याने बांग देताच वाड्यात गडबड सुरू झाली. दिल्ली दरवाज्यावरच्या नगारखान्यातून नौबतीचे सूर हळूच बाहेर पडले. हमामखाना त्यांच्या स्वागतासाठी सज्ज झाला. पाच सुवासिनींनी कान्होजींना कुंकू लावलं. त्यांच्या मस्तकावर पाचजणींनी सागराचे पाणी ओतले. त्यानंतर श्रीगजाननाचे स्मरण करीत त्या त्यांना न्हाणू लगल्या. ते स्नान करून बाहेर आले, तेव्हा वाजंत्री वाजत होती. त्यांनी ओलेत्यांनीच मातेच्या पायांना स्पर्श करून आशिर्वाद घेतला.
ते आपल्या महालाकडे आले तेव्हा हुजऱ्या त्यांची वस्त्रं घेऊन उभा होता. पोशाख करून ते ब्रम्हेंद्रस्वामींनी दिलेलं कुंकूम रेखण्यासाठी आरशासमोर उभे राहिले. आपल्या काळ्या सावळ्या राकट चेहऱ्यावर झळाकी दिसत असल्याचे पाहून त्यांना समाधान वाटलं. त्यांनी गळ्यात मोत्यांचा कंठा घातला. मनगटात पोच आणि बोटात पुष्कराजची अंगठी घातली. ते महालाच्या

बाहेर आले. समोर ब्रह्मेंद्रवामींकडून शुभवेळ आणि प्रसाद घेऊन आलेले जोशीबुवा उभे होते. कान्होजींनी त्यांना स्वत: आत आणलं. बिंबाबाई तिथंच उभी होती. ती कौतुकभरल्या नजरेनं तो सोहळा पहात होती. कान्होजी म्हणाले.

''बाबा, आज प्रथम-मान तुमचा आहे. मी तुम्हाला नमस्कार करतो.''

''बेटा, मी कारण मात्र झालो. कर्ता करविता श्रीगजानन.''

जोशीबुवांचा हात त्यांच्या पाठीवरून फिरू लागला. त्यातून काहीतरी अपरिचित असं आपल्या शरीरात प्रवेश करीत असल्याचा त्याला भास झाला. भिवजी गुजरानं येऊन सर्व तयारी झाल्याचं सांगताच कान्होजी महालातून बाहेर आले.

''खडी ताजीम, बा अदऽब बा मुलाहिजाऽ सरखेल कान्होजी आंग्रे पधार रहे हैऽऽऽ.''

गुर्झबदारांच्या ललकाऱ्यात ते चालू लागले. दरबारात प्रवेश करताच शेले पागोटी नम्र झाली. कान्होजी धिम्या चालीनं मसनदीकडे वळले. वाजंत्र्यांचा गजर झाला. पुरोहित मंत्र म्हणू लागले. त्या पवित्र वातावरणात कान्होजींनी मसनदीवर मस्तक नम्र केलं. पुरोहिताला भरपूर दक्षिणा देऊन पदस्पर्श होऊ न देता ते मसनदीवर स्थिरावले.

दरबारी मंहळींनी मुजरे घातले. साताऱ्याहून आलेली सरखेलीची वस्त्रं त्यांनी अंगावर चढवली. भिवजी गुजराच्या मागून इतरांनी त्यांना ''सतका'' देण्यास सुरुवात केली. कान्होजींनी सरदारांस वस्त्रं आरि अलंकार दिले. त्यांनी जोशीबुवांना त्यांचं वतन देण्याचा निश्चय जाहीर केला. अत्तर, गुलाब आणि निरोपाचे विडे दिल्यावर कान्होजी उठून गुर्झबदारांच्या अल्काबात चालू लागले.

* * *

# 5

येसूबाई आणि शाहू महाराजांना कैदेत ठेवून औरंगजेब मराठी राज्य गिळंकृत करू पहात होता. त्यानं झुल्फिकारखानाला पाठवून सागरगड कर्नाळा सुधागडावर ताबा मिळवला होता. सिद्धी याकूतखानाने मोगलांशी हातमिळवणी केल्यामुळे मराठ्यांची पीछेहाट होऊ लागली. तरीही ते जिवावर उदार होऊन त्यांचा प्रतिकार करण्याची शिकस्त करीत होते. कान्होजीनी सिद्दीशी उघड-उघड सामना देण्याची जय्यत तैयारी केली. आरमार सज्ज ठेवण्यासाठी त्यांनी अनेक तरुणांना नोकऱ्या दिल्या. त्यांना शिकवून तयार करण्याची योजनाही आखली. जंजिरे कुलाबा मुकाबला करण्यास सिद्ध करून ते बाहेर पडले. यावेळी भवानी, नारायण बहिरी, मनोरी, जगजीवन आदी जहाजं आणि गुरबे घ्यायला ते विसरले नाहीत. त्यांनी कोकणचा समुद्रकिनारा आपल्या ताब्यात घेऊन, मोगल सैनिकांना चोप देण्यास सुरुवात केली. मोगल हटत गेले आणि सागरगड त्यांच्या ताब्यात आला. त्यांच्या सैनिकांना खूप आनंद झाला. ते भजन गात अपली खुषी व्यक्त करीत होते. आकाशात फिरणारा चंद्रही त्यांना शीतल किरणांनी न्हाऊ घालीत होता. सागरही उचंबळून किनाऱ्याकडे धावत होता. कान्होजी आपल्या मानाजी, रघुजी बरोबर बसून पुढचे मनसुबे बांधीत होते. तेव्हाच श्रीकृष्णपंत येऊन तिथे थरथरत उभे राहिले, रीतीप्रमाणे मुजरा करायचं भानही त्यांना राहिलं नाही. चांदण्यातही त्यांचा घाबरलेला चेहरा कंपित होणारे ओठ त्यांच्या नजरेतून सुटले नाहीत.

"काय पंत?"

"सरकार, घात झाला. राजा..."

"बोला, आम्हाला कोड्यात टाकू नका."

"सरकार, सिंहगडावर राजाराम महाराजांचं निधन झालं."

लोडाला टेकून बसलेले कान्होजी ताडकन् उभे राहिले. डोळे गरगर फिरवीत. पंतांना हलवून त्यांनी विचारलं.

"पंत, जागेपणीच बोलता आहात ना?"

"सरकार, आताच थैली घेऊन घोडेस्वार आला."

महाराजांच्या मृत्यूच्या बातमीनं ते खूप व्यथित झाले. त्यांनी महाराजांनी दिलेली पगडी हाती घेतली.

"पंत, ... फार दु:खदायक घटना आहे. आम्ही आज पोरके झालो."

"सरकार, दैवापुढं कोण जाणार? आता दु:ख आवरून त्यांनी घालून दिलेल्या मार्गानं जाणं आपलं कर्तव्य आहे."

"होय, तुमचं म्हणणं खरं आहे. आम्ही राणीसाहेबांना भेटून यावं म्हणतो."

"ठीक आहे."

पंतांनी गडावर फडफडणारा भगवा झेंडा खाली उतरवून. तीन दिवस नगारखान्यातला चौघडा बंद करण्याचा हुक्म दिला.

कान्होजी विशालगडावर आले. आपल्या आगमनाची खबर पाठवून ते राणीसाहेबांसमोर उभे राहिले.

“मातुश्री राणीसाहेब, आपल्यावर कोसळलेलं दु:ख आम्ही जाणतो. परंतु ईश्वरेच्छेपुढं मानवाचं काय चालणार? ही सल्तनत आपल्या आधारानंच उभी रहाणार आहे. म्हणून शोक आवरून आम्हाला मार्ग दाखवावा.”

राणीसाहेबांनी आवंढा गिळून दु:खाचा कढ मागं परतवला. मस्तकावरचा पदर उजव्या हातानं त्यांनी घट्ट ओढला.

“कान्होजी, तुमच्यासारखे पराक्रमी आणि साहजी वीर आमच्यापाशी आहेत. तोपर्यंत आम्हाला सल्तनतीची चिंता नाही. तुम्ही बरेच दुर्ग आणि गड परत मिळवले असं आम्ही ऐकून आहोत.”

“होय राणीसाहेब.”

या तुमच्या कामगिरीवर खुश होऊन आम्ही तुम्हाला “कोकणचा राजा” हा खिताब देत आहोत. तसंच मुंबई ते वेंगुर्लेपर्यंत किनाऱ्याच्या संरक्षणाची जिम्मेदारी तुमच्यावर टाकण्यात आम्हाला संतोष आहे.

राणीसाहेबांचे मधुर शब्द थांबताच, त्यांनी नम्र झालेली गर्दन वर उठवली.

समोर ताराऊराणीसाहेब मंचकावर बसल्या होत्या. त्यांच्या अंगावर श्वेत वस्त्र होतं. गळ्यात मोत्यांची माळ आणि कानात हिऱ्याच्या कुड्या चमचमत होत्या. त्यांचा तेजस्वी गोरापान चेहरा दु:खानं झाकोळला होता, तरीही त्यांच्या निळ्या डोळ्यांत कर्तबगारीचं तेज, कान्होजीला दिसल्यावाचून राहिलं नाही.

“यांच्या नेत्रात सूर्याची पिल्लं नाहीत ना?” स्वत:लाच प्रश्न विचारून ते मनात हसले.

ताराऊराणीसाहेबांनी सांगितलेलं सगळं ध्यानी घेऊन, त्यांनी राणीसाहेबांना मुजरा केला.

* * *

पुत्राला प्राप्त झालेलं ऐश्वर्य, मानमरातब पाहून बिंबाबाई फार सुखावली. ती आपला मोकळा वेळ जास्तीत जास्त भजनापूजनात घालवू लागली. आजही सकाळी स्नान, देवपूजा आटोपून ती महालाकडे वळली. तेव्हा सरखेल आंग्रे मुजऱ्यासाठी छज्जात खोळंबले होते. समोरून येणाऱ्या मातेला पाहून, ते तिच्याबरोबर आत गेले.

“आईसाहेब, किती उशीर?”

“झाला खरा.”

कान्होजीनी पुढं सरकून मातेच्या पायाला स्पर्श केला. बाहेर जाण्यासाठी वळत असताना ती उत्तरली.

“कान्हू, तुम्हाला थोडी फुरसत असेल तर बसा.”

“बोला, तुमच्यापुढं समयाचं काय?”

“तसं नव्हे बाळा, राज्याचे काम महत्त्वाचे म्हणून विचारले.”

“ते आम्ही जरूर करूच! आता देर न करता सांगा. आम्ही ऐकतो आहोत.”

पहाटे-पहाटे आमच्या स्वप्नी काळंविका देवी आली आणि म्हणाली, “बिंबे, तुझे सगळे मनोरथ पूर्ण झाले. आता माझी उत्तम व्यवस्था कर. या भागात रहाण्याची माझी इच्छा आहे...”

“पुढं काय?” कान्होजींची उत्सुकता वाढली.

“आम्हाला पूर्ण जाग आली. डोळे उघडून पाहिले, परंतु कोणीही नव्हते. समुद्राकडून वाऱ्याचा

झोत आत आला आणि सुगंधानं खोली भरून गेली.''
''आईसाहेब, विशाळगडावरून आल्यावर, मला असंच काहीसं स्वप्न पडलं होतं.''
''तुम्ही हे आमच्यापाशी आज बोलता आहात ना?''
''कामाच्या धांदलीत विसरून गेलो.''
''याबाबत काय ठरवलंत?''
''तुम्हीच सांगावं.''
''अलिबागेत हिराकोटात देवीचं मंदिर उभारावं.''
''ठीक आहे... तुमच्या इच्छेप्रमाणं करतो.''
कान्होजी मातेचा निरोप घेऊन, झराझर पावलं टाकीत सदरेत आले.
संध्याकाळ झाली. प्रकाश धूसर झाला. रोषनाईक दीपकाठी घेऊन झुंबरं उजळू लागला. कान्होजी महालाच्या छज्जातून सागराकडे पहात गंभीरविचार करीत होते. महालाच्या द्वारात उभं राहून पंतांनी खबर धाडली. पंतांना येण्याची परवानगी देऊन, ते खिडकीपासून दूर झाले. आपल्या आसनावर बसत, त्यांनी पंतांच्या मुखावर नेत्र स्थिर केले. पंतांच्या गोऱ्या कपाळी चंदनाचा तिलक होता. कानांत मोत्यांचा चौकडा असून, त्यांच्या छातीवर मोती पोवळ्यांची माळ होती. अंगात पांढरी बाराबंदी असून खाली धोतर होतं. पंतांच्या ओठावर दिसत असलेल्या हलक्या काळ्या रेघेकडे पहात त्यांनी आपल्या मिशीवर हात फिरवला.
''या पंत काय विशेष?''
''या कागदावर आपण सांगितल्याप्रमाणं गलबताची आकडेवारी दाखवली आहे. परंतु मला वाटतं...''
''मोकळेपणानं सांगा.''
''यांच्या दुरुस्तीत पैसा आणि कष्ट खर्ची घालण्यापेक्षा नवी खरेदी करावी.''
''परंतु त्यापेक्षा निराळीच योजना आहे.''
''सांगावी.''
''पंत, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग, सिंधुदुर्ग आणि कुलाब्यात जहाजं बांधण्याचे कारखाने सुरू केले तर...''
''सरकार, मला अगदी तस्संच वाटत होतं. परंतु बोलायचं धाडस नव्हतं.''
''म्हणजे आमची कल्पना तुम्हांला आवडली! मात्र यासाठी बाकबगार लोकांची जरुरत आहे.''
''या कामासाठी उपयोगी पडणारे उत्तम सुतार आमच्या नजरेत आहेत.''
''कुठले?''
''हर्णेतले.''
''जडाजोखमीचं काम आहे. ते विश्वासू असणं आवश्यक आहेत.''
''मी त्यांची परीक्षा घेऊनच निश्चित करीन.''
पंतांच्या चेहऱ्यावरून त्यांना काहीतरी बोलण्याची इच्छा असल्याचं जाणून, कान्होजी बोलले.
''पंत, मनातलं सगळं सांगत चला. आमच्यापाशी संकोच कशाचा?''
''तसं नाही सरकार. जरा विचार करीत होतो.''
''कसला विचार करता! स्पष्ट बोला.''
''तोफा ओतण्याचा कारखानाही सुरू व्हावा अशी इच्छा आहे.''
''सबूरीनं घ्या, सिद्दीसातचा कोरलई थोड्याच दिवसात हाती येईल. तिथंच आपण तोफांचा कारखाना सुरू करू.''
''तोफा, गुरबे हाती आल्यावर, या किनाऱ्यावर येण्याची सिद्दीची काय बिशात आहे?''

"पंत, चुकलात, तोफा-जहाजाबरोबर उत्तम सारंग आणि दारुगोळा नको का?"
"होय सरकार, ही महत्त्वाची बाब माझ्या ध्यानातच आली नाही."
"बरोब्बर, पंत तुम्ही लेखणी बहाद्दर. तुमच्या ध्यानात हे बारकावे येणारच नाहीत."
कान्होजी खळाळून हसले. त्या हास्यानं तो महाल निनादित झाला. आपली मर्यादा सांभाळून पंतांनी त्यांना साथ दिली. इतरही काहीबोलून पंत उठले, तेव्हा वाड्यावरची धांदल निसूर होत चालली होती.
मोतद्दारानं घोडा आणून उभा केला. कान्होजींना खबर मिळताच ते मातेचा निरोप घेऊन निघाले. त्यांना पहाताच केसरी फुरफुरू लागला. मोतद्दारानं मुजरा करून, अत्यंत अदबीनं त्यानं रेशमी कायजा त्यांच्या हाती दिला.
"केसरी, ... चलो."
राणोजी गोळे, कृष्णाजी धुळुप, विठोजी नाईक, शंकराजी मोहिते, बाजी विचारे आदी मंडळींबरोबर ते निघाले. नि:शब्द शांततेत फक्त जमिनीवर पडणाऱ्या घोड्यांच्या टापांचा लयबद्ध आवाज वातावरणात भरत होता. हवेतली शीतलता अतिशय सुखद वाटत होती. कान्होजी हबश्यांच्या पारिपत्त्याचा विचार करीत दौडत होते. ते चिपळुणात आले, तेव्हा आकाशातले ढग नवे रंग घेऊन रूपे बदलीत होते. सूर्यकिरणं खाली उतरत होती. गाव आळस झाडून, जागा होऊ लागला होता. घोड्यांना पाणी पाजण्यासाठी ते एका तलावाजवळ थांबले. सूर्यकिरणांना अंगावर घेऊन, श्वेतकमळांना फुलवणारा तो तलाव फारच सुंदर दिसत होता. त्याच्या सभोवर हिरवीगर्द झाडी होती. मधोमध देवीचं मंदिर होतं. घोड्यांना सोडून ते मंदिरात प्रवेशले. गाभाऱ्यात समई मंद तेवत होती. सूर्यकिरणं देवीच्या मुखावर स्थिरावली होती. ती समाधानानं हसत असल्यामुळं, तिच्या नेत्रांतले हिरे चमचमत होते. तिच्या पायाशी वाहिलेली तगरीची टवटवीत फुलं सर्वांच्या नेत्रांना आकर्षित करीत होती. कान्होजींनी पाच मोहरा देवीपुढं ठेवून नमस्कार केला. ते प्रदक्षिणेसाठी वळत असताना मागून आलेल्या भयानक आवाजानं दचकून ते उभे राहिले.
"धावा हो धावाऽऽ सोडवाऽऽ"
राणोजी गोळे कमरेतल्या तलवारीवर हात ठेवून धावत आला. त्याच्या चेहऱ्यावर भय उभं होतं.
"सरकार, कोणा स्त्रीची ही किंकाळी आहे. मला वाटते हबश्यांनी तिला पळवली असावी."
"राणोजी, अंदाज करण्याची ही वेळ नव्हे. तिला मुक्त करणं आपलं कर्तव्य आहे."
"चलावं सरकार."
सगळे घोडे दौडत गेले. दोन हबशी एका स्त्रीला ओढीत असलेलं पाहून कान्होजींचा जळफळाट झाला. ते ओरडले.
"छोड दो उसको."
"तुम कौन हो कहनेवाले."
"तुम्हारे बाप, ... छोड दो."
"नही, नही, क्या करोगे कुत्ते?"
सर्वांचे हात तलवारीकडे गेले. कान्होजी, राणोजींनी पुढं सरकून त्यांच्या मानेवर तलवारीचा वार केला.
"तोबाऽऽ तोबाऽऽ" करीत ते धिप्पाड हबशी जमिनीवर पडले.
रक्ताच्या चिळकांड्यांनी कान्होजींचा डगला भिजून गेला. तलवार म्यान करीत त्यांनी समोर नजर फेकली. मघाची तरुणी थरथरत उभी होती. तिचे नेत्र हरिणीसारखे सुंदर होते. तिचे ओठ

बोलण्यासाठी फुरफुरत असल्याचं त्यांच्या ध्यानी आलं.
"बाई, तुमचं घर कुठंय?"
"महाडिक वस्तीवर."
"आम्हांला घर दाखवाल?"
"होऽ"
चारपाच जणांना घेऊन ते त्या मुलीबरोबर चालू लागले. वस्तीजवळ येताच ती जलद चालू लागली.
"आयाबायांनी एकटं फिरण्याचे हे दिवस नव्हंत. तुम्ही एकट्या कशापायी आलात?"
"माज्या बरुबर पाच-सा जणी होत्या. पण ह्या मेल्यांना पाहून त्या कुठंतरी लपल्या. आज तुम्ही नसता..."
महाडिकवाडीतल्या एका लहानशा घरात ती शिरताच, ते अंगणातच उभे राहिले.
मातेशेजारी बसून न्याहरी करीत असलेल्या बंकाजीनं तिला विचारलं.
"आज इतक्या लवकर कशी आलीस."
"दादू, हळू बोल. बाहेर मानसं आलीत."
"कोन आले?"
"ठाऊक नाही, परंतु त्यांनी हबश्यांच्या तावडीतून सोडवलंय मला!"
"पोरीच्या तोंडून हबश्यांचं नाव ऐकताच म्हातारीचा देह कंपित झाला. ती कानांवर बोटं मोडीत बोलली.
"आईजरीमरीची कृपा."
बंकाजी कांबळं घेऊन बाहेर आला. ओटीवर कांबळं पसरून त्यानं मंडळींना बसण्याची विनंती केली.
"सरकार बसावं."
कुणाच्या तरी मुखातून निघालेला "सरकार" हा शब्द ऐकून बंकाजी चपापला. बावरलेल्या मनानं त्यानं हात जोडले.
"आपण?"
"आम्ही ... सरखेल कान्होजी आंग्रे."
"काय? कान्होजी आंग्रे?"
"होऽऽ. तुम्हांला आश्चर्य वाटण्याचं कारण?"
"सरकार, मला आपल्या भेटीस जाण्याचा स्वप्नात साक्षात्कार झाला. कसे जावे याच चिंतेत होतो."
बंकाजीनं आत जाऊन सर्व हकीगत आपल्या मातेला सांगितली. तो बहिणीला घेऊन बाहेर आला.
"सरकार, हिच्यावर नजर टाकावी."
"का?"
"ही आपल्या घरी जावी, आमची सोयरीक जुळावी अशी इच्छा आहे."
"सगळं खरं, परंतु आमच्या आईसाहेबांना आणि स्वामींना विचारल्याशिवाय आम्ही बोलणारच नाही."
"सरकार, रात्री ब्रह्मेंद्रस्वामीच स्वप्नात आले."
"बंकाजी, आम्ही तिकडेच निघालोत. त्यांची सलाह घेऊन सांगू."
"ठीक आहे, परंतु आमच्या मथुला नजरेखाली घालावी."

मथुनं गुळ-पाणी आणून ठेवलं. कान्होजींनी तिला एका दृष्टिक्षेपात पाहून घेतली. त्यांना ती आवडली. समोर उभा असलेला बंकाजी उपयोगी ठरेल, असा विचार करून त्यांनी विचारलं.

"बंकाजी, तुम्ही आरमारात सामील व्हाल?"

कान्होजींच्या शब्दांनी त्याच्या अंगावर मोरपिस फिरवलं. त्याची तीव्र इच्छा फळाला येत असल्याचं पाहून तो आनंदला. त्याच्या नेत्रांत कृतज्ञतेचे अश्रू उभे राहिले. त्यानं त्याच्या पायांवर मस्तक ठेवलं.

"सरकार, देवानंच आपल्याला धाडले बगा."

* * *

ब्रह्मेंद्रस्वामींनी तशी सूचना केल्यानंतर, बिंबाबाईनं स्वत: जाऊन मथुरेच्या हाती मिठाई दिली. विवाह निश्चित झाला. जंजिरे कुलाबा, सरखेल कान्होजी आंग्रेच्या लग्नाच्या तयारीत गुंग झाला. स्वत:च्या पसंतीनं बस्ता बांधला. सोन्या-मोत्यांचे दागिने घडवून घेतले. सर्वांना आमंत्रणं रवाना झाली. कान्होजी मात्र अवचितगड, कनकदुर्ग, जयगड काबीज करण्यात गुंतले होते. यांत तह मिळताच ते आनंदीत झाले. ती खबर ताराऊराणीसाहेबांना पाठवून ते घराकडे वळले.

भव्य शामियाना उभा होता. कनातींवर लावलेली सुवर्णाची फुलपाखरं चमचमत होती. हिऱ्यामोत्यांचं नाजुक नक्षीकाम किनखापी पडद्यांवर शोभत होतं. झुंबरातून रंगीबेरंगी प्रकाशकिरणं गालीच्याकडे झेपावत होती. रेशमी बैठकांवर, पानाफुलांच्या चित्रकारीनं नटलेली लोडं स्थिर झाली. हिरव्यागार विड्यांची सोन्याचांदीची तबकं चकाकू लागली. मधुर सनई "बिहाग" नटू लागली. त्यामुळं वातावरण गंधित झालं. आतिशबाजी होऊ लागली. तोफांची सलामी झाली. कान्होजी देवशंख आणि श्रीफळ घेऊन सजवलेल्या घोड्यावर स्वार झाले. वाजंत्र्याच्या गजरात जाऊन त्यांनी श्रीगणेशाचं दर्शन घेतलं. अकरा मोहरा आणि हिऱ्याचा बटवा ठेवून नमस्कार केला.

ते पायउतार होऊन पुढं सरकू लागले तेव्हा शामियाना झगमगत होता. मध्यभागी पाट मांडून पुरोहित तांदूळ, सुपाऱ्या, आम्रपर्ण घेऊन तयारी करीत होते. कान्होजी येऊन एका पाटावर उभे राहिले. मंत्रघोषात त्यांच्यासमोर अंतरपाट धरला गेला. सर्जेराव मामांनी पिवळ्या वधुवस्त्रातील मथुरेला आणून त्यांच्यासमोर उभं केलं. मंगलाष्टका सुरू झाल्या. आशिर्वादाच्या अक्षता मस्तकावर विसावू लागल्या. मथुरेच्या हातातली वरमाला कान्होजींच्या गळ्यात स्थिर झाली. वाजंत्र्याचा घोष सुरू झाला.

* * *

# 6

पश्चिम किनाऱ्यावर आंग्र्यांचा जोर वाढू लागला. फिरंगी, फ्रेंच, डच, टोपीकर इंग्रजांच्या डोळ्यांत काट्यासारखे सलू लागले. टोपीकरांनी त्यांचा पाडाव करण्याचा खूप प्रयत्न केला. परंतु कान्होजींच्या शिबंदीनं त्यांना प्रत्येक वेळी भरपूर चोप देऊन परत पाठविलं. परंतु टोपीकर माघार घेणारे नव्हते. ईस्ट इंडिया कंपनीनं 'बून' या गव्हर्नरला काही सूचना देऊन पाचारण केलं. त्यानं मुंबईच्या किनाऱ्यावर घोषणा केली.

''त्या आंग्र्याला पराजित करण्यासाठीच आम्ही आलो.''

कान्होजी टोपीकरांना चांगलेच जाणून होते. त्यांनी आपले नजरबाज खबरे पाठवून बातम्या मिळवायला सुरुवात केली.

दुपारचं भोजन झाल्यावर कान्होजी पहुडले होते. मथुराबाई त्यांना काही प्रश्न विचारीत आपली चोळी शिवत होती. द्वारावर उभ्या असलेल्या दासीनं खबर देताच ते बाहेर आले. भगव्या वस्त्रांतला साधू उभा होता.

''श्रीहरीऽ श्रीहरी'' ... तो परवलीचा शब्द ऐकताच, त्यांची खात्री झाली. त्यांनी मागंपुढं पाहून विचारलं,

''काय खबर आहे साधूमहाराज?''

''आपला नि:पात करण्यासाठी गवनेर 'बून' आलाय. मुंबैत उतरल्याबरोबर त्यानं तशी परतिग्या बी केली

''अस्सं. होय. मग पहातोच. आमच्याशी गाठ आहे म्हणावं.''

त्यांनी मिशीला पीळ भरला. कपाळावरच्या झुलुपांनी अनुमोदन दिलं. साधू मुजरा करून दुसऱ्या कामगिरीवर निघाला. कान्होजींनी योग्य सूचना देताच खांदेरीत जोरदार तयारी सुरू झाली, प्रत्येक सैनिक इंग्रजांना हरविण्यासाठी जिवावर उदार झाला. परंतु टोपीकरांची ॲडिसन, व्हिक्टरी, फिग्रेट, रिन्हेज सारखी लढाऊ जहाजं खांदेरीच्या आसपास असलेली पाहून ते मनातून घाबरलेच. अशा परिस्थितीत 'बून'ने अग्निगोलकांचा वर्षाव करताच आंगऱ्यांची शिबंदी बावरून पळू लागताच, कान्होजी हवेत हात उंचावून ओरडले.

''सागरात उड्या टाका आणि जहाजांचा तळ फोडा. जय आमचाच आहे.''

त्यांच्या जोशपूर्ण आवाजात भलतीच जादू होती. क्षणार्धात शेकडो सारंग समुद्रात उतरले. गलबतं फुटल्यामुळं आत पाणी शिरलं. ते वाढणारं पाणी पाहून कप्तान केस्ट्रो फार निराश झाला. त्यानं बूनला परत जाण्याची सलाह दिली. खांदेरी बेट त्या दिवशी आनंदानं मोहरून गेलं. शिबंदी तुकारामांचे रसाळ अभंग गाऊन नाचू लागली.

* * *

कान्होजींचा वाढदिवस असल्यामुळं खास दरबार भरला होता. गुर्जबरदारांच्या अल्काबात

सरखेल कान्होजी आंग्रे दरबारात प्रविष्ट झाले. दरबारी मंडळी आदरानं नतमस्तक झाली. स्मितकटाक्ष फेकीत ते पुढं सरकू लागले. आज जरीच्या फुलांच्या पिवळ्या उगल्पात त्यांचं सावळं रूप उठून दिसत होतं. खाली खुतनीचा चोळणा असून, पायांत जरीचे चढाव होते. कमरेतल्या रेशमी शेल्यात हिरेजडित तलवार बांधलेली होती. छातीवर मोत्यांचे पेंड होते. त्यातला शंखाकृती पाचू अतिशय सुंदर दिसत होता. कानातल्या सुवर्णाच्या कड्या लखलखत होत्या मस्तकावरच्या पगडीतला हिऱ्याचा शिरपेच आणि मोत्यांचा तुरा सर्वांचं लक्ष आकर्षित करीत होता. कान्होजीचे नेत्र समाधानानं हसत होते. ते मसनदीवर स्थिर झाले. मागं जरीच्या किनारीचं तांबडं निशाण फडफडत होतं, त्यावर सुवर्णाच्या तारांनी बनवलेला शंख सर्वांचे नेत्र दिपवून टाकीत होता. जवळच ढाल आणि भगवा झेंडा होता. पाच पुरोहित त्यांच्याजवळ येऊन मंत्र म्हणू लागले. कान्होजींनी त्यांना नमस्कार करून दक्षिणा दिली. त्यांचे आशीर्वाद घेऊन, ते उभे राहिले. सरदार मंडळींनी ‘‘सतका’’ देऊन मुजरे केले.

खांदेरीत मिळवलेल्या विजयाबद्दल त्यांनी मंडळींस वस्त्रालंकार देऊन खूष केलं. अत्तर-गुलाब झाल्यावर ते उठले. गुर्जबरदाराने दरबार बरखास्त झाल्याची घोषणा केली. त्यांच्या ललकाऱ्यांत ते चालू लागले.

संध्याकाळ असूनही मथुराबाई पलंगावर पडून होती. तिची तबीयत ठीक नसल्यामुळं खास दासी चंपा तिथंच उभी होती. बंकाजीला महालाच्या दरवाज्यात पहून मस्तकवरचा पदर सावरीत ती जणू पुटपुटली.

‘‘मामाजी आयलेत राणीसाहेब.’’

‘‘ठीक आहे, बोलाव त्यांना.’’

बंकाजीला आत पाठवून चंपा द्वारावर उभी राहिली. मथुराबाई पलंगावरच तकियाला टेकून बसली.

‘‘बसा दादासाहेब.’’

बंकाजी तिच्या समोरच्या मंचकावर बसला. बहिणीच्या प्रकृतीचीही त्यानं चौकशी केली. परंतु तो यासाठी आलेला नाही, ते तिनं जाणलं होतं. त्याच्या चेहऱ्याकडं पाहून तिला ते थोडंसं समजलं होतं. म्हणूनच तिनं आडवा प्रश्न टाकला.

‘‘आज आमचे दादा बहिणीच्या महालात कसे आले?’’

‘‘ताईसाहेबांनी टोमण्यात बोलू नये.’’

‘‘सहज बोललो, त्यात वाकुडेपणा नाही.’’

‘‘ठीक आहे, आता ऐका आम्ही सांगतो ते.’’

‘‘बोला.’’

‘‘ताईसाहेब, सरखेल कान्होजी आंग्रेंनी सर्व पराक्रमी वीरांना बहुमूल्य बक्षिसं दिली.’’

‘‘त्यांत तुम्हला आनंद वाटला नाही का?’’

‘‘आनंदऽऽ ... होऽहो वाटला ना!’’

‘‘दादासाहेब, असं का बोलता?’’

‘‘का ते समजलं तर तुम्ही सुद्धा अवाक् व्हाल ताईसाहेब! विठोजी मोरे, शिवाजी नाईक, कृष्णाजी धुळुप वगैरे मंडळींना दाजींनी वस्त्रालंकार दिले. आम्ही त्यांचे मेहुणे आहोत. हे ध्यानी घेऊन, त्यांनी आमची प्रतिष्ठा राखणे जरूर नव्हते काय?

‘‘बिलकुल.’’

‘‘त्यांनी आम्हाला कवडीमोलाचा हा शेला देऊन सन्मान केला.’’

‘‘दादासाहेब, या शेल्याची तुम्हांला किंमतच करता आली नाही.’’

‘‘आम्ही नाही समजलो तुमच्या शब्दांतला मतलब!’’
‘‘बरोबरच आहे. त्याचं मूल्य जाणायला मन फार मोठ्ठं असावं लागतं!’’
‘‘ताईसाहेब, असं कोड्यात बोलू नका.’’
‘‘बंकाजी महाडिक, तुम्ही आमचे भाऊ किंवा त्यांचे मेहुणे नसून एक सरदार आहात. विशेष पराक्रम करून दाखविण्यासाठीच हा शेला दिलाय. यानं कमर बांधून तैयार रहाण्यासाठी दिलेलं हे आव्हान आहे.’’
‘‘परंतु...’’
‘‘नाही, या परीस जास्त ऐकून घेण्याची आमची मनस्थिती नाही. तुम्ही परत जाण्यास मुक्त आहात.’’
आपल्या बहिणीचे सडेतोड आणि जरबेचे शब्द ऐकून बंकाजी रागानं निघून गेला.

* * *

जंजिरे कुलाबा आनंदात निमग्न झाला. उत्साहाला उधाण आलं. श्रीकृष्णपंतांनी हत्तीवरून साखर वाटण्याची व्यवस्था केली. पुत्रलाभानं आनंदीत झालेले कान्होजी आंग्रे स्वामींच्या दर्शनासाठी निघाले. बिंबाबाईचं मन आनंदानं थुईथुई नाचू लागलं. तिनं सोनाराला वाड्यावर बसवून दागिने तयार करून घेतले. मनगट्या तोरड्या, वाळे, साखळ्या, वाघनखं पारखीत ती म्हणाली,

"सुनबाईसाठी केलेलं दाखवा."

"या हिऱ्याचे गोठ आणि ही कंकणं."

"ठीक आहे. याचा पैका खाजगीतून घ्या."

"तो कुठं जातोय? परंतु आईसाहेब, आपल्यासाठी काहीच घेतलं नाही."

"नातवाचं तोंड पाहायला हा देह अजून राहिला होता. आता आम्ही मोकळे झालो. आम्हांला दागिने काय करायचेत?"

सोनार मुजरा करून निघाला बिंबाबाई दागिने-वस्त्रं आणि इतर तयारीत मग्न झाली.

दिवस गडबडीत सरकत गेले. नामकरणाचा दिवस निश्चित झाला. ताराऊराणीसाहेब, टोपीकर, फिरंगी, सिद्दी याकूबखान, खेम सावंत, मोगल वगैरेंच्या प्रतिनिधींची किल्ल्यात गर्दी झाली. कान्होजी स्वत: जातीनं सर्वांचा इंतजाम करीत होते. दुपारी पक्वान्नाचं भोजन करून मंडळी उठेपर्यंत संध्याकाळ झाली. वाजंत्री वाजू लागली. सरदारणी स्त्रिया पाळण्पाशी जाऊन उभ्या राहिल्या. वस्त्रालंकारांनी सजलेली मथुराबाई आपल्या राजस बाळाकडे पहात उभी होती. गाणी गात स्त्रियांनी पाच वेळा बाळाला पाळण्याखालून वर आणलं. कुणीतरी विचारलं.

"आईसाहेब नाव काय ठेवायचं?"

"त्याच्या पनजोबाचं नाव ठेवा सेखोजी. होय ना सूनबाई."

"आम्ही आपल्याबाहेर नाही."

बाळाला पाळण्यात ठेवून. दत्ताजीची बहिणी बाळाच्या मुखात साखर घालीत बोलली.

"""तुमचं नाव... सेखोजी-सेखोजी-सेखोजी!"

"आतीबाई नाव ठेवलंत. आता मुलगी द्यायचं वचन द्या भाच्याला."

"इश्श, हे हो काय वहिनी?"

"वन्स आत्ता नव्हे, होईल तेव्हा."

मैनाबाई लाजून दूर जाताच सगळ्याजणी मजेत हसत पाळण्याला झोका देऊ लागल्या. पाळणाही गाऊ लागल्या.

"बाळा जो जो रेऽऽ, कुलभूषणा, रघुवीर नंदनाऽऽ"

सेखोजीला आलेले हिऱ्या-मोत्यांचे अलंकार आणि मनोहर रंगीत कपडेपट पाहून, मथुराबाईला खूप आश्चर्य वाटलं. तिनं सर्व बाळलेणी अतिशय कौतुकानं बिंबाबाईच्या स्वाधीन केली.

रात्री भोजन झाल्यावर, मंडळी नाचीच्या महालाकडे निघाली. सजलेल्या महालाच्या मध्यभागी गोव्याची गुलाब कलावंतीण बसली होती. तिच्या बाजुला साजिंदे वाद्यं जुळवीत होते. सरखेल कान्होजी आंग्रे आपल्या आसनावर स्थिरावताच, मधुरस्वरांनी महाल भरून गेला. गुलाबनं उठून कान्होजींच्या मनगटात मोगऱ्याचा गजरा बांधला. ती मुजरा करून, त्याच पावली मागं पाय टाकीत आपल्या जागी स्थिर झाली. तिनं मालकंस, दरबारी कानडासारखे राग गाऊन सर्वांना मंत्रमुग्ध केलं.

"अब ठुमरी पेश करो."

कान्होजींचा इशारा होताच तिनं अत्यंत मधुर स्वरात ठुमरी भैरवी छेडायला सुरुवात केली.
"बालम मत जा, मैं तोसे नहीं बोलूँगीऽऽ नहींऽऽ."
ती सम पकडण्यासाठी पुढं सरके तेव्हा तबल्याची थापही चपखलपणे तिला साथ देई आणि कान्होजींच्या मुखातून उद्गार बाहेर पडत.
"वाहवा, बहोत अच्छाऽ"
कोकणच्या राजाकडून दाद मिळत असल्यामुळं गुलाब मोहरून गाऊ लागली. कान्होजी तिच्या गाण्यावर फारच खूप झाले. त्यांनी गळ्यातला कंठा काढून तिच्यासमोर धरला. तिनं तो मस्तकाला लावून तबकात ठेवला. महफिल संपली तेव्हा कोंबड्यानं बांग दिली होती. कान्होजी उठले. गुलाबनं पुढं येऊन नम्र मुजरा घातला.
"काय आहे?"
"सरकार आपण उदार असल्याचं कानी आलंय. आपण या कोकणचे राजे आहात, मीही सागरकन्याच आहे. आपण मला आश्रय द्यावा."
ते बावरलेल्या नजरेनं पहात राहिले. काय करावं तेच त्यांना समजेना. त्यांची मनस्थिती ओळखून तीच उत्तरली.
"आपण हुकुम द्याल तेव्हा मी गाईन सरकार."
"ठीक आहे, आमच्या आईसाहेबांना भजनं ऐकविण्याची जिम्मेदारी तुमच्यावर आहे."
"आज्ञा सरकार."

* * *

कान्होजी सिद्दीसातच्या प्रतिकारात गुंतले असता मोगल सम्राट औरंगजेब पैगंबरवासी झाला. शाहजादा आझमनं शाहूला कैदेतून मुक्त केलं. मराठा सरदारांची सत्ता विभागली. 'मराठी राज्याचा खरा वारस संभाजीपुत्र शाहू की राजाराममहाराजांचा पुत्र शिवाजी' हा कठीण प्रश्न सोडवण्यात सरदार गुंतून पडले. ताराऊराणीसाहेबांनी आपल्या सरदारांना खलिते पाठवून लढाईसाठी तैयार राहण्याची सूचना दिली. तसा खलिता त्यांनी कान्होजीसही पाठवला. रावजी हातात थैली घेऊन महालाच्या प्रवेश द्वाराशी आले. तेव्हा कान्होजी सेखोजीचा घोडा बनले होते. त्यानं हाताचा चाबूक त्यांच्या पाठीवर मारताच ते हसत होते. ह्या खेळात त्यांना स्वत:च्या प्रतिष्ठेचाही विसर पडला होता.
"सरकार रावजी आलेत."
"बाळराजे ... आता इथंच मंचकावर बसा. आम्हांला थोडं काम आहे."
"कशलं?"
"तुम्हाला ... इतक्यात समजणार नाही."
"समजनाल आम्हाला, कारण आम्ही मोथ्थे आहोत."
"छे:-छे:"
"होय, ... थोरल्या आईशायेब म्हनल्या की तुम्ही आता "दादा" होनाल. न्हानाला कोण दादा म्हणतं का?"
"वाहवा ... अगदी छान बोलता तुम्ही!" ते मुक्तपणानं हसत सुटले.
आत आलेल्या रावजींनाही हसू आवरलं नाही. ओठावर उपरणं ठेवून त्यांनी आपली हसण्याची मर्यादा आवरली.
"सरकार महाराणीसाहेबांचा खलिता आहे."
"वाचा."

“आलेले शाहूराजे हे मराठी राज्याचे खरे वारस नसून तोतया आहेत, हे ध्यानी घेऊन कोणाच्याही भुलथापास फसू नये. यावेळी तुम्ही अतिशय सावध राहोन किनाऱ्याची हिफाजत करावी. आम्ही बोरघाटातील राजमाची आणि कल्याण-भिवंडीचा बंदोबस्त तुम्हावरी सोपवला आहे.”

“या स्वराज्याची भकलं पाहणं नशिबी आलंय. दुसरं काय?”

“सरदार कसलीही खंत न करता कर्तव्य तडीस न्यावं. स्वार्थाचा शिरकाव झाला की असंच असायचं.”

आतल्या दरवाज्यातून दासी आली. ती अतिशय घाबरलेली होती. ती कंपित स्वरात उत्तरली.

“सरकार आ...ई.... साहेबऽऽऽ”

“बिंबाबाई बरेच दिवस आजारी होती. मथुराबाई जातीनं शुश्रुषा करीत होती. राजवैद्य प्रयत्नांची पराकाष्ठा करीत होते. परंतु सुधारणा नव्हतीच. आज सकाळीच ती पुत्राशी काळंबिका देवीच्या नवसाबद्दल बोलली असल्यामुळे कान्होजी स्वस्थ चित्तानं सेखोजीशी खेळत राहिले होते. दासीचे शब्द ऐकताच ते लटपटत चालू लागले.

ते महालात गेले तेव्हा बिंबाबाई अंतिम क्षण मोजीत होती. आपल्या मातेची ती क्षीण अवस्था पाहून त्यांना कसंसंच झालं. ते घोगऱ्या स्वरात पुटपुटले.

“आऽऽ आऽऽ गं.”

तो स्वर ऐकण्यासाठी घुटमळणाऱ्या बिंबाबाईनं हळूहळू डोळे उघडले. पुत्राकडे पाहून तिचे ओठ हलू लागले.

“मलाऽऽ मांडीऽऽ.”

कान्होजींनी मातेचं मस्तक मांडीवर घेऊन शंखानं तिच्या मुखात पाणी घातलं. तिचा देह थोडासा कंपित होऊन अचेतन झाला. मथुराबाईंनी पदराचा बोळा तोंडात कोंबून दु:ख गिळलं. मातेची अंतिम क्रिया झाल्यावर त्यांनी अपार दान-धर्म केला. मातेची समाधी बांधण्याचा हुकुम देऊन ते डेरेदाखल झाले. जाताना मार्गांत त्यांचं चौफेर लक्ष होतं. त्यांनी परिस्थिती जाणली. सागरावर जागता पहारा ठेवण्यासाठी त्यांनी विश्वासू अधिकाऱ्यांची नेमणूक केली. त्यांच्या बंदोबस्तासाठी पेशवा बहिरोपंत पिंगळे येत असल्याची खबर समजताच ते त्वरेनं राजमाचीकडे निघाले. त्यांनी आपल्या फौजा अशा रीतीनं पसरल्या की बहिरोपंतांची फौज कोंडली गेली. त्यावर हल्ला करून त्यांनी बहिरोपंतास गिरफ्तार केलं. राजमाची, लोहगड जिंकल्याची बातमी त्यांनी राणीसाहेबास धाडली.

रात्रीचा समय होता. चौथीची चंद्रकोर गर्द निळ्या आकाशात चांदण्यांशी गुजगोष्टी करीत होती. सागराच्या लाटांचा खळखळ आवाज वाड्यात भरून राहिला होता. सेखोजी आणि संभाजीला जवळ बसवून कान्होजी ध्रुवबाळाची गोष्ट सांगत होते. मथुराबाई चोळीवर कशिदा काढीत बसली होती. संभाजी काहीतरी प्रश्न विचारीत असताना हुजऱ्यानं मखमलीची लाल थैली ठेवून मुजरा केला.

“जा पंतांना बोलाव.”

“खलिता वाचण्यासाठीच ना?”

“होय.”

“काही जरूरत नाही. आम्ही वाचतो.”

“ठीक आहे.” ते कौतुकानं हसले.

हुजऱ्या निघून जाताच मथुराबाईनं थैलीचा सरफास सैल केला. वळणदार अक्षराचं पत्र त्यांनी हाती घेतलं.

“कुणाचं?”
“बाळाजी विश्वनाथ.”
“वाचा-वाचा. ते आमचे गुरुबंधू आहेत.” कान्होजींच्या मुद्रेवर उत्सुकता आणि खुशी ओसंडत होती.
‘तुकोजी संकपाळ आंग्रे तुमचे वालिद. थोरले शिवाजीमहाराज यांजपाशी एकनिष्ठ सेवा करोन ते वागले. ऐसे असोन शाहू महाराज वडील. तेच सिंहासनाचे खावंद. ते तख्तावर आले असता त्यांशी दुरोख राखून, धाकटे भाऊ यांजकडे मिळोन, सरकारी तालुके घेतले व प्रधान यास धरून नेले हा सेवकाचा धर्म की काय? तुम्ही महाराजांच्या सेवेस रुजू झालेवर आम्ही तुम्हांस मातबर सुभेदार मानू.’

मथुराबाईनं खलिता वाचून पतीकडे पाहिलं. कान्होजींचा चेहरा चिंताग्रस्त दिसत होता. त्यांच्या मनात विचारांचा डोंब उसळला होता. निर्णयाप्रत येणं त्यांना कठीण वाटू लागताच त्यांनी अपेक्षेनं पत्नीकडे पाहिलं.
“राणीसाहेब मराठी राज्याचा खरा वारस कोणास म्हणावं?”
“शाहू महाराजास.”
“परंतु आमची भक्ती दुसऱ्या पक्षास असली तर?”
“स्वारींनी योग्य विचार केल्यास गलती समजून येईल.”
“म्हणजे?”
“थोरल्या महाराजानंतर संभाजी महाराजच छत्रपती झाले. म्हणून तख्तावर शाहूमहाराजांचाच अधिकार असल्याचं तुम्हांला मान्य आहे ना?”
“होय.”
“मग तोच आपला राजा. स्वारीनं दुसऱ्या मार्गाला जाऊ नये.”
“ठीक आहे. ... आपली आज्ञा सरकार.”
“इश्श हे काय?”
रेखोजी-संभाजीचं काहीतरी बिनसलं. संभाजी फुरंगटून आईकडे आला.
“आईशायेब हा दादा आम्हाला “लाजा” म्हनत नाई.”
“शंभू ते मोठे आहेत. त्यांनाच तुम्ही राजा म्हणाचं.”
“आमी नाई म्हननार. आमीच लाजा आहोत.” तो हातपाय आपटीत रडू लागला.
मथुराबाईला संभाजीचा राग आला. सेखोजीला नेहमीच त्रास देणाऱ्या संभाजीच्या गालावर तिनं पाचही बोटं उठवली. त्याला तो अपमान सहन झाला नाही. त्यानं सेखोजीच्या हाताला कडकडून चावा घेतला. ता कळवळला. त्याच्या नेत्रांत अश्रू आले. दाताखाली ओठ दाबून तो चुपचाप बसला.
“चंद्रा ... बाळराजेंना घेऊन जा.”
तिचे शब्द संपण्यापूर्वीच चंद्रानं संभाजीला उचलून कडेवर घेताच सेखोजी चुपचाप चालू लागला. रावजी आत आले. नम्रतेनं मुजरा करून ते उत्तरले.
“सरकार, सातारहून स्वार आल्याचं कानी आलं परंतु खलिता हाती आला नाही हे कळविण्यासाठी आलो.”
“ठीक आहे. त्याबद्दल चौकशी करा. आता लेखणी घेऊन बसा.”
“आज्ञा सरकार.”
रावजी लिहिण्यासाठी तयारीत बसले. मथुराबाई आत जाण्यासाठी वळली. कान्होजींनी

तिच्याकडे पहात म्हटलं,

"थांबा राणीसाहेब, - 'तुम्ही या मामल्यात लक्ष घालावं' - असं आम्हांस वाटतं.

"आम्ही बाई माणूस, आम्हास काय समजणार?"

"रांधप, अन् हा कशिदा, काय जन्मत:च शिकलात?"

"बघून-बघून येऊ लागलं."

"होय ना? ... मग तस्संच हे शिका."

"बरं बाई." असं म्हणून ती खुदकन हसली. जवळच्याच मंचकावर बसून तिनं रावजीकडे नजर टाकली.

"रावजी, बाळाजी विश्वनाथास लिहायचे आहे."

"सांगावं सरकार."

'आपण सर्व फौज मागे ठेवोन कार्यास कारण फौज घेवोन किल्ल्यानजीक यावे म्हणजे भेटी होवोन बोलणीही होतील. विचार ठरेल तो खरा. आपले विचारे महाराजांची कृपा होय ऐसे करू.'

पत्र पुरं करून त्यांच्यासमोर ठेवलं. त्यांनी त्या ओळी डोळ्यांखाली घालून विचारलं.

"राणीसाहेब बरोबर आहे ना!"

"हो."

"पत्र तुरंत रवाना करा रावजी."

"आज्ञा सरकार."

रावजी मुजरा करून महालातून बाहेर पडले.

* * *

# 7

कुटुंब-कबिल्यासह अलीबागेस काळंबिकादेवीच्या दर्शनास गेलेल्या कान्होजींची पालखी दिल्ली दरवाजासमोर भोयांनी उतरली. ते पायउतार होऊन वाड्याकडे निघताच सर्वांचे मुजरे झाले. सुस्तावलेला वाडा एकदम सावध झाला. ते मुख्य दरवाज्यात येताच गांवतिणींनी त्यांच्या पायांवर पाणी घातलं. आपल्या पत्नी-मुलांसमवेत ते महालाकडे वळले. वस्त्रं बदलून ते पुढच्या प्रशस्त दालनात आले तेव्हा विठोजी मोरे त्यांची वाटत पाहत होता. तो मुजरा करून उभा राहिल.

''विठोजी काही विशेष?''

''कुलाब्यावर टोपीकर आणि फिरंगी चालून येत असलेची खबर आहे.''

''तैयारीला लागा.''

''सरकार, तोफा आणि गलबते अगदी तयारच आहेत.''

''विठोजी, तरीसुद्धा गाफिली उपयोगी नाही. शिबंदीला पूर्ण सावध करा.''

''जी सरकार.''

''यावेळी प्रथमच कोळी लोकांचा भरणा करा. कोणत्याही बाबतीत कमतरता नको.''

''कोळी मिळणे कठीण वाटते.''

''वेसावे कडून बोलवा. झुंज द्यायचं काम उत्तमप्रकारे तेच करतात.''

''होय जन्मापासून खाऱ्या पाण्यातच वावरतात.''

''म्हणूनच त्यांची भरती करा. तुम्ही स्वत: जातीनं निवडून आणा.''

''जी.''

इतकं बोलणं होऊनही विठोजीला तिथंच घुटमळत उभा राहिल्याचं पाहून त्यांना आश्चर्य वाटलं. त्यांनी विचारलं.

''विठोजी, बोला, आम्ही ऐकतो आहोत.''

''सरकार काही विचारलं तर...'' विठोजीच्या मुखातून पुढचे शब्द बाहेर पडले नाहीत.

''बेशक सांगा. आम्ही रागावणार नाही.''

''सरकार शिदोजी जगताप शहाण्णवकुळी मराठा. पन पोरीचं लगीन अडलंय...''

''लग्न कशासाठी अडलंय?''

''वय वाढलंय म्हून.''

''का?''

''ते मोठे पुराण आहे.''

''सांगा, मग पाहू काय करता येतं का!''

चार वर्सं झली. शिदोजीची पोर मामाकडं गेलती. तवा या देखण्या पोरीला हबश्यांनी पळवली. एका झाडाखाली तिला उतरून दे दोघे नदीवर गेले. तेवा ती करवंदाच्या जाळीत जाऊन लपली आन दोन दिवसांनी घरला आली.

“उत्तम-उत्तम.”

त्यांचे नेत्र आनंदाने चमकले. त्यांना मथुराबाईची याद आली. तो प्रसंगही त्यांच्या नजरेसमोर उभा राहिला.

“सरकार राजा आहेत. त्यानी करून घेली तर...” तो त्यांच्या चेहऱ्याकडे पहात राहिला.

“विठोजी ‘आम्ही तिच्याशी विवाह करावा’ असं तुम्हाला वाटतं की काय?”

होय सरकार, त्यात काहीच गैर नाही. राणीसाहेबसुद्धा कबूल आहेत.”

“मग आमचीही हरकत नाही.”

त्यांच्या आश्वासनानं विठोजीचा चेहरा उजळला. तो निरोप घेऊन ताबडतोब शिदोजी जगतापकडे गेला.

“फक्त पंधरा दिवसांतच जगतापाच्या राधेनं कान्होजींना वरमाला घातली.

* * *

दिनमणीची माणिकरंगी किरणं बुरुजावरून खाली उतरू लागली. मासे पागून आलेले गाबीत चिलीम ओढीत, ओल्या वाळूतच बसले. त्यांच्या बरोबर असलेल्या तरण्या पोरांनी समुद्रातली जाळी ओढून वाळूवर पसरली. चमकणाऱ्या माश्यांनी भरलेले हारे घेऊन ते निघाले.
कान्होजीचा “केसरी” द्रुतगतीने दिल्लीद्वारातून बाहेर पडला. ते पद्ममाचीवर उभे राहून काही तरी विचार करीत असताना त्यांचा हुजऱ्या समोर उभा राहिला. त्याचा चेहरा आनंदानं उजळला होता. मुजराही न करता तो घाईघाईत उत्तरला.

“सरकार बाळराजांना भैनऽऽ”

कन्याप्राप्तीचा कन्होजींना खूपच आनंद झाला. त्यांनी तर्जनीतला पुष्कराज त्याला देऊन टाकला. ती अंगठी कपाळी लावून तो निघून जाताच, कान्होजी पुढं-पुढं सरकू लागले. सूर्य माथ्यावर आला तरी ते फिरत होते. दूरवर समुद्रात त्यांना एक नाव दिसली. किनाऱ्यावरचे दोन कोळीही दृष्टिपथात आले. ते हळूच मागं परतले. त्यांनी आपला अंदाज संकराजी मोहितेला सांगितला. ताबडतोब संकराजीनं घोड्यावर मांड घेतली. निवडुंगाच्या गर्द झाडीतून तो घोडा पळवीत होता. ते कोळी नसून इंग्रज असल्याचं जाणून त्यानं त्वेषानं भाला फेकला, आणि आसपास असलेल्या सैनिकांना इशाऱ्याचं निशाण दाखवलं. सगळे सैनिक धावत आले. येताना छातीत भाला घुसून रक्तबंबाळ झालेल्या कर्नल मॅथ्युजचा देह आणून त्यानी संकराजी समोर ठेवला. सैनिकांना लपून बसलेल्या इंग्रजांवर तुटून पडण्याचा आदेश देऊन तो मॅथ्यूजकडे वळला. त्याच्यावर झाडपाल्याचे औषधोपचार करण्याची वैद्याला सूचना देऊन तो निघाला. दोन दिवस लढाई सुरू होती. टोपीकरांचे रिव्हेंज गलबत, कर्नल मॅथ्यूज, कर्नल कोकेन, कॅप्टन स्मिथ समवेत आंगऱ्यांच्या हाती आलं. इंग्रजी रणवाद्ये पराजयाचे “आर्त”स्वर काढू लागली. आता पश्चिमेचा सागर किनारा आंगऱ्यांच्या अधिकाराखाली आला.

थंडी सुरू झाली. कोकणातल्या लोकांना ती हवा सुखद वाटू लागली. कान्होजी इंग्रजांचा बीमोड करण्याच्या योजना आखू लागले. त्यासाठी त्यांनी दरबारला निमंत्रित केलं. खासे सरदार येताच कान्होजी निघाले. त्यांच्यासमोर शेले, पागोटे, पगड्या झुकल्या. त्यांच्या भक्तीचा स्वीकार करून ते मनसदीवर स्थिरावले. पंत उभे राहिले. सर्वांचे नेत्र त्यांच्यावर स्थिर झाले. त्यांत उत्सुकता भरलेली होती.

“सरकार, शस्त्रं, दारुगोळा, रसद आणि तोफा भरलेली गलबतं कुलाब्याकडे येत असल्याची खबर आहे.”

“त्यासाठी कुलाबा समर्थ होणं आवश्यक आहे.”

“सरकार त्यासाठीच बाळाजी विश्वनाथानं एक हजार पायदळ, पंधराशे घोडेस्वार धाडीत असल्याचा खलिता आताच आलाय.” मधल्या दरवाज्यातून आत येत असलेले रावजी उत्तरले.
“बहोत अच्छा. आता आम्हास चिंता नाही.”
त्याच्या पायाशी वीरासन घालून बसलेल्या सेखोजीनं विस्मयानं पित्याकडे पाहिलं. ‘सरखेलसारख्या मोठ्या माणसाला चिंता असते’ हे त्याला आत्तापर्यंत माहीतच नव्हतं. त्याबाबत पित्याला विचारायचं ठरवून तो स्तब्ध झाला. पंत हातातले कागद सावरून त्यावर दृष्टी टाकीत उत्तरले.
“सरकार अलिबागेत कोळ्यांचं वास्तव्य असल्याचं आपल्या ठाऊकी आहे. त्यामध्ये दोन पक्ष पडलेच. त्यात देवाच्या खऱ्या भगताविषयी तंटा उत्पन्न झालय. आपणच न्याय द्यावा.”
“पंत अलिबाग आणि वरसोलच्या कोळ्यात वाद निर्माण झाल्याचं आम्ही ऐकलं होतं, परंतु न्यायनिवाड्यासाठी दरबारात येईल असं वाटलं नव्हतं.”
“सरकार त्यातली भांडणं विकोपाला गेल्यावरच ते इथं आले.” रावजी बोलले.
क्षणभर शांतता पसरली. कान्होजी विचारात गुंग झाले. परंतु निर्णय देणं कठीण असल्याचं त्यांच्या प्रत्ययास आलं.
“यात न्याय देणं फार अवघड आहे. दरबारनं याबाबत आग्रह धरू नये.”
“हा प्रश्न सोडवायचा कसा?” संकराजी मोहिते बोलले.
“त्यांनी कार्ल्यात जाऊन देवीच्या पायाशीच कौल मागावा.”
“मी त्यांना त्याप्रमाणं कळवतो सरकार.” पंतांनी एका कागदावर काहीतरी लिहिलं.
“दुसरं काय?”
“सरकार ... हे प्रकरणही तस्संच आहे.”
“बोला. आम्ही ते ऐकायला फार उत्सुक आहोत.”
“कोकणात कोकणस्थ आणि क्रमवंत या ब्राह्मणांच्या पोटजाती. त्यांच्यात भिक्षुकीच्याच संबंधात तंटा निर्माण झालाय.”
“स्पष्ट सांगा पंत.”
“हरभट लेले, वेदूमर्ती अप्पा भट क्रमवंत शाखेचे असल्यामुळं कोकणस्थ त्यांना हीन लेखतात. पंगतीला घेत नाहीत.”
“आमचे कुलोपाध्याय क्रमवंत शाखेचे ब्राह्मणच आहेत. आमचे न्यायशास्त्री वासुदेव भट्ट क्रमवंतच आहेत. याबाबत आता काही न बोलता बाळाजी विश्वनाथाशी पत्रव्यवहार करूनच ठरवावं असं आम्हास वाटतं.”
रावजी उठून उभे राहिले. त्यांना काहीतरी विशेष सांगायचं आहे हे कान्होजींनी जाणलंच.
“रावजी निर्भयपणे बोला.”
“सरकार माफी असावी. परंतु सैनिकांचा चार महिन्यांचा पगार थकला आहे. तिजोरीत पैसा नाही...” पुढचे शब्द त्यांच्या ओठांनी बाहेर पडू दिले नाहीत.
“टोपीकर, फिरंगी, डच, सिद्दी आणि मुघलांच्या मालवाहू जहाजावर कडा पहारा ठेवा. जकात चुकवून जाणारा सर्व माल ताब्यात घ्या. म्हणजे आपली तिजोरी कधीच खाली राहणार नाही.”
“सरकार, टांकसाळ सुरू केली तर!! ...”
“समजलो. कोकणात आमचीच नाणी व्यवहारात असावीत असंच म्हणयचं ना?”
“होय सरकार.”
“ठीक आहे, आपण अलिबागेस टांकसाळ करणे योग्य आहे. रावजी, त्यासाठी किती पैका लागेल ते पहा.”

“आज्ञा सरकार.”
संकराजी मोहिते उभे राहिले, परंतु त्यांच्या मुखातून शब्द बाहेर पडत नव्हते. कान्होजी हसून म्हणाले.
“संकराजी, तुम्हाला अभय आहे. शौकसे बोला.”
“सरकार, विठोजी आंग्रेनं सखूबाई पुरविणीच्या घरावर पैशासाठी गाढवाचा नांगर फिरवला.”
हे शब्द ऐकताच, त्यांचा चेहरा ताठरला. नेत्र कठोर दिसू लागले, ते रागानं ओरडले.
“विठोजी आमचा नातलग असला तरी त्याची गय करणार नाही. मंडळी, राज्य नातंगोतं जाणत नाही. त्याची पूर्ण चौकशी करून, आरोप सिद्ध झाला तर त्याला हत्तीच्या पायी द्या.”
पंतांनी कामं संपल्याचं सांगताच, अत्तरगुलाब घेऊन कान्होजी उठले.

* * *

कान्होजी भैरवनाथाचं दर्शन करून बाहेर आले. त्यांच्या समवेत संकराजी मोहिते, हरजी जगताप, विठोजी मोरे, कृष्णाजी पाल वगैरे मंडळी होती. मार्गातच त्यांना परवलीचे शब्द ऐकू आले. त्यांनी मागं पाहून हातानं इशारा केला. बरोबर चालणाऱ्या मंडळींशी काही विचार विनिमय करून ते आपल्या वाड्याकडे वळले. उन्हातून आल्यामुळं त्यांना खूप तहान लागली होती, आणि घामही आला होता. हुजऱ्यानं त्यांची वस्त्रं बदलून, चांदीचं जलपात्र त्यांच्यासमोर ठेवलं. पाणी पिऊन तृप्त मनानं, मंचकावर बसून खिडकीतून दिसणारं सौंदर्य निरखू लागले.
महालाच्या बाहेर हुजऱ्या कुणाशी तरी जोरात बोलत आहे असं त्यांच्या कानी आलं. त्यांनी दरडावून विचारलं.
“कोण आहे रे?”
“अलऽऽख निरंजन अलऽऽख.”
त्यांनी तो परिचित स्वर ओळखला येशा हिंदळेकरला आत पाठविण्याचा हुजऱ्याला त्यांनी हुकम दिला. त्यानं येऊन त्रिवार मुजरा केला. त्याचा बावळा वेष पाहून त्यांना मजा वाटली. परंतु त्याबद्दल ते बोललेच नाहीत.
“येशाजी, आज काय खबर आणलीत.”
“सरकार, बातमी गमतीची, पन खोड्योत टाकनारी आसा.”
“सांगा. आम्ही ऐकतो आहोत.”
“सरकार, सिद्दीसातला सावनूर बंकापुरच्यो पठाणाने एक हत्ती दिलो. तो अंजनवेली सुभ्यात आणूक खूप अडचणी होते.”
“बरोबर, बंकापूरपासून अंजनवेलीपर्यंत मराठ्यांच्या चौक्या आहेत. त्यांच्या नजरेतून मुंगी जाणं कठीणच.
“सरकार, पुढं लय गंमत!”
“काय घडलं?”
“सिद्दीसातने खटपट करून युगत लडवली. स्वॉमीचे मराठी राज्यात लय वजन हाय, हे तेला माहित होतं. तेनं तेचाच उपयोग करायचं ठरवले.”
“म्हंजे त्यानं काय केलं?”
“आपली आज्ञा सर्व राज्यात मान्य आहे, यास्तव वरघाटे आपा जोशीस पाठवून पंतप्रधान व पंतप्रतिनिधी यांची दस्तके हत्तीच्या सुरक्षित जाण्यासंबंधी आणवून द्यावी.”
येशानं पाठ केलेला तो मजकूर न अडखळता धडाधड म्हणून दाखवताच, कान्होजीना त्याचे फार कौतुक वाटलं. परंतु पुढचे वृत्त ऐकण्यास ते अतिशय उत्सुक असल्यामुळे त्यांनी

विचारले.
"पुढं काय? स्वामींनी उत्तर पाठवलं का?"
"व्हय तर. आम्हास भिक्षार्थ सावनूर प्रांते जाणेचे आहे. तुमचे हत्ती आमच्या समागमे येतील. दस्तकाचे प्रयोजन नाही."
"स्वामींबरोबर हत्ती आला का?"
"व्हय. त्यासाठी धा पठान, दादा गुरव कर्णेकरी, अंताजी नारायण कारकून, खंडोजी साबळी निशाणवाला ह्या मानसाना हत्तीच्या दीमतीस धाडलं."
"येशा, विशाळगडास कोणी अडवलं नाही?"
"तिथंच इरोध झाला. तेवा स्वामींनी गडावरून कागद आणून हत्ती सोडवला. पुढं माखजनास हबश्यांच्या चौक्या लढू लागल्या."
"स्वामी कुठं होते? कान्होजींची उत्सुकता फारच वाढली."
"स्नानासाठी ते मागल्या तीर्थावर रवले."
"मग हत्तीचं काय झालं?" कान्होजींना हसू आवरलं नाही.
"आपल्या अधिकाऱ्यांनी हत्ती ताब्यात घेऊन जयगडास पाठैला. हबश्यांनी चिडून अंजनवेलीस वर्दी पोचती केली."
"कसली?"
"स्वॉमीनी तो हत्ती कजियो निमित्त करोन सरखेल कान्होजी आंग्रेच्या सोधीन केला."
"म्हणजे सिद्दीसात आमच्यावर हमला करणार एवढंच ना?"
"न्हाई सरकार, तो परशुराम क्षेत्रावर सोरी करणार."
"आम्हाला इथून तुरन्त जाणे जरूर आहे म्हणायचं!"
"होय सरकार."
"ठीक आहे. येशाजी, आज तुम्ही फार महत्त्वाची खबर आणली. आम्ही तुमच्यावर फार खुश आहोत." कान्होजींनी गळ्यांतला मोत्याचा सर काढून त्याला दिला. त्यानं अत्यंत कृतज्ञतेनं त्यांचे पाय धरले.

* * *

चारपाच दिवसात भरपूर तयारीनिशी कान्होजी आंग्रे निघाले. वाटेतच त्यांना सिद्दीसातनं केलेल्या परशुराम क्षेत्रातली त्यानं जाळलेली घरं, उध्वस्त केलेला प्रदेश, आणि स्त्रियांवर केलेले अत्याचार पाहून ते खवळले. त्यांनी आपल्या फौजास आदेश दिला. सैनिकांनी सिद्दीसातच्या फौजास घेरून टाकलं. त्यांच्या सगळ्या हालचाली बंद करून, मराठे त्वेषाने तुटून पडले. हबश्यांची मस्तकं धडापासून वेगळी होऊन जमिनीवर पडली. किंचाळ्या, दु:खोद्गारनं तो परिसर अत्यंत भयंकर वाटू लागला.
सिद्धीसात "अल्लाची दुवा" मागत असताना सिद्धी बहराम धावत पळत येऊन ओरडला.
"भागो-भागो, मरगट्टे आए हैऽऽ"
सगळं तसंच टाकून तो पळत सुटला. उरल्या-सुरल्या फौजाही सैरावैरा पळू लागल्या. कान्होजींनी बरीच लूट मिळवून, सिद्दीसातचा चांगलाच नक्षा उतरला. त्याचवेळी ब्रम्हेंद्रस्वामी प्रगट झाले. रम्य झाडीत विसावलेलं परशुराम क्षेत्र बेचिराख झालेलं पाहून स्वामींना फार... फार दु;ख झालं. सिद्दीसातला शाप देऊन ते साताऱ्याजवळ धावडशीला गेले.
कान्होजींना विजय मिळाला, परंतु आपल्या प्रदेशातून स्वामी निघून गेल्यामुळं ते व्यथित मनानं वाड्यावर परतले.

# 8

कान्होजींच्या वाड्यावर सेखोजी, संभाजी, लाडू आणि लक्ष्मीबाईचे तुळाजी, मानाजी भलतीच गडबड उडवून देत असत. त्याच बरोबर त्यांचं शिक्षण पण चालूच होतं. आरमारी लढाईचं शिक्षण त्यांना कुलाब्याच्या सागर किनाऱ्यावरच मिळत होतं. मथुराबाई आणि लक्ष्मीबाई जातीनं मुलांकडं लक्ष ठेवीत होत्या. त्यामुळं कान्होजी अगदी निर्धास्त होते.

शिशिरांतली थंडी आणि पानगळती संपवून वसंतानं झाडांवर नवा साज चढवला. नाजूक हिरव्या पानांनी झाडं सजली. कोकिळा आपल्या मधुर आवाजानं आमराई भरून टाकू लागली. सुरंगीचा मधुर सुवास दरवळू लागला. निळसर निरभ्र आकाशात पक्षी स्वच्छंदानं भ्रमण करू लागले. शिकारीला गेलेले कान्होजी तृप्तीच्या खुषीनं वाड्याकडे परतले. दुपारची वेळ. मथुराबाई मुलाशी बोलत बसली होती. समोरून येणारे घोडेस्वार पाहून तुळाजी उठला. तो पळतच महालाच्या द्वारात जाऊन ओरडला.

"आबासाहेब आलेऽ. आबासाहेब आलेऽऽ."

"तुळू असं मोठ्यानं ओरडू नये." सेखोजीनं जाऊन त्याच्या पाठीवर हात ठेवला.

"का!"

"आपण सामान्य नाही. सरखेल कान्होजी आंग्रेचे पुत्र आहोत."

"असलो म्हणून काय झालं?" संभाजीनं धुमसत असलेला राग बाहेर फेकला.

समोर चाललेली शब्दाशब्दी ऐकून मथुराबाईला बरं वाटलं नाही. संभाजीची समजूत काढण्यासाठी ती बोलली.

"शंभू, दादानी सांगितलेलं बरोबर आहे. त्यांचं ऐकावं."

"आईसाहेब तुम्ही नेहमी त्यांचीच बाजू घेता!"

"असं नाही शंभू. तुम्ही गैरसमज सोडून द्या."

ते शब्द कान्होजींच्या कानात पडले. महालाच्या प्रवेश द्वारातूनच त्यांनी विचारलं.

"अपसमज कुणाचा कुणी केला?"

त्यांच्या आवाजानं दचकून मथुराबाईंनी ढळलेला पदर मस्तकावर ठेवून उत्तर दिलं.

"मुलांची भांडणं. ... दुसरं काय?"

"आमची मुलं झगडतात हेच आम्हांला पसंत नाही. शंभू तुम्ही सर्वांनी दादांचा शब्द मानणं जरूरी आहे."

"का?" मानाजीनं ताठ स्वरात विचारलं.

कान्होजी-मथुराबाई त्या स्वरानं दचकले. परंतु मुलांकडे दुर्लक्ष करून त्यांनी पतीकडे कटाक्ष फेकला. त्यांच्या चेहऱ्यावर राग उमटला होता. विषय बदलून राग कमी करण्याच्या इराद्यानं त्यांनी प्रश्न केला.

"आज कसली शिकार केली स्वारींनी?"

"वाघ आणि भेकरं. फार-फार मजा आला."

संभाजी पुढे सरकून पित्याजवळ गेला. त्यांना स्पर्श करीत विचारलं.
"आबासाहेब पुढच्या खेपेस आम्हांस न्याल का?"
"जरूर-जरूर."
"आम्ही पण येणार."
"तुम्ही पण या तुळाजी."
त्यांना तिथंच सोडून सेखोजी मानाजीला घेऊन बाहेर गेला. त्याला जाताना पाहून संभाजीला तिथं बसणं अशक्य झालं. तोही उठून चालू लागला. श्रीकृष्णपंत महालाच्या द्वारात खोळंबले होते.
"या पंत. फक्त राणीसाहेब आहेत."
पंत अतिशय गंभीर चेहऱ्यानं येऊन उभे राहिले. त्यांना काहीतरी सांगायचं होतं. परंतु मूक होऊन उभे होते.
"काय पंत?"
"सरकार अत्यंत दु:खद वार्ता आहे. बाळाजी विश्वनाथऽ"
"कायऽऽ"
"सरकार ... त्यांचं निधन झालं."
"कसली बिकारी झाली."
"सात दिवस ताप आला."
"अरेरे! अवघे चाळीस-एकेचाळीस वर्षांचे होते. पंत राज्याचं फार फार... नुकसान झालंऽ."
"सरकार ... मनुष्य विधात्याच्या हातातलं बाहुलं आहे. दिलेलं काम संपल्यावर तो क्षणही राहू देत नाही."
"तेही खरंच! पंत एक खतपत्र तैयार करा."
पंतांनी शोकसंदेशाचं पत्र लिहून ताबडतोब रवाना केलं.

* * *

परशुरामक्षेत्राचं पुनर्वसन करण्याचा निश्चय करून त्या कामावर कान्होजींनी बंकाजीची नेमणूक केली. त्यानंतर स्वत: जातीनं जाऊन त्यांनी बंकाजीला सूचना दिल्या. बंकाजीनंही अत्यंत जबाबदारीनं त्या क्षेत्राला पूर्वीचं स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. त्यानं उभे केलेले क्षेत्र पाहून कान्होजी फार सुखावले. परंतु स्वामींच्या खलित्यानं त्यांची खुशी पार नाहीशी केली. ते फार फार नाराज झाले. त्यांनी रावजींना तुरंत बुलावा धाडला. परंतु रावजींची तबियत ठीक नसल्यामुळं त्यांनी पुत्राला पाठवलं. त्यानं येऊन मुजरा केला. खाजगीत नुकताच रुजू झालेल्या पोराकडे पाहून कान्होजींना त्याच्या कर्तुत्वाबद्दल थोडी शंका आली. परंतु थोडंसं हसून त्यांनी पंतांची चौकशी करीत विचारलं.
"कृष्णराव आम्ही सांगतो त्याप्रमाणं लिहाल का?"
"होय सरकार. एकदा अनुभव घेऊन पहावा."
"ठीक आहे. कागद आणा."
कृष्णराव कागद-लेखणी घेऊन बसला. कान्होजींच्या कथनानुसार खर्ड्यावर त्यांची लेखणी कुरुकुरू लागली. काळीभोर सुंदरअक्षरं उमटू लागली. कान्होजी त्याच्याकडे पहात पुढं सांगू लागले.
'व्याजाचा हिशेब येणे व हत्तीमुळे पंचवीस हजार रुपये पडिले इत्यादी श्रीस द्यावे असे लिहिले. परंतु स्वामी तो परमहंस. त्यांना सुखदु:ख समानच असता क्षणाक्षणाच्या फलाण्यामुळे फलाणे

जाहले. हत्तीमुळे फलाणे गेले असे स्वामींकडून येते. याचा मतलब आमचे ध्यानी येत नाही. आमचेजवळ काही बाकी असेल तर व्याजासकट हिशेब करोन स्वामींकडेच बाकी निघेल ते स्वामींस कळले पाहिजे.'

कृष्णरावनं ते पत्र त्यांच्यासमोर धरलं. वाचून त्यांच्या मुद्रेवर स्मित झळकलं. त्यावर हस्ताक्षर करीत ते उत्तरले.

"कृष्णराव आजच जाऊ द्या."

"आज्ञा सरकार."

* * *

दुपारच्या विश्रांतीनंतर ते आपल्या महालात लक्ष्मीबाई बरोबर सोंगट्या खेळत होते. डाव अगदी रंगत चालला होता. प्रवेशद्वारावरच्या दासीनं येऊन सातारहून सरदार आल्याची खबर दिली. कान्होजी ताबडतोब उठलेच. अपुरा डाव टाकून पतीला उठत असल्याचं पाहून लक्ष्मीबाईला फार राग आला. लाल झालेलं नाक पदरानं पुसत तिनं तोंड वाकडं केलं. नथही हलली.

"मांडलेला डाव अर्धाच टाकून जाणं स्वारीला साजेसं नाही."

"खरं आहे, परंतु यावेळी जाणं भाग आहे."

पत्नीला पुढं बोलायची संधी न देता ते पुढच्या दालनात आले. तिथं उभ्या असलेल्या दिनकररावांनी त्रिवार मुजरा घातला.

कान्होजी त्यांच्याकडे बघत होते. तो मनुष्य चांगलाच उंच आणि सुदृढ होता. तो उत्तम खानदानी असावा असं त्यांना वाटलं. त्याचे कपडेही उंची असल्याचं भासत होतं. त्याच्या मस्तकावरचा गुलाबी शेमला त्याला फारच शोभून दिसत होता. कान्होजीच्या मुद्रेवरचं प्रश्नचिन्ह जाणून तो उत्तरला.

"माझं नाव दिनकरराव भोसले. महाराजांनी मला आपल्याकडे महत्त्वाच्या कामासाठी पाठवलंय."

"सांगा."

"महाराजांच्या कुळातली लेक आपल्या पदरी पडावी अशी त्यांची इच्छा आहे."

"परंतु." कान्होजी बुचकळ्यात पडले.

"मी त्यांचा रिश्तेदार. सोयरीक जुळवण्यासाठीच मी आलोय."

"आमच्याशी?" कान्होजी खळाळून हसले.

"होय."

"दिनकरराव आमच्या दोन पत्नी आहेत. मुलंही आहेत. आता लग्न करू नये असं वाटतं."

"नाही म्हणू नये. ... माझी लेक गहिनाबाई आपला भाग्योदय घडविणारी असल्याचं राजज्योतिषानं भविष्य वर्तवलंय."

"ठीक अहे. महाराजांच्या इच्छेबाहेर आम्ही नाही. मात्र हा विवाह साधेपणानं व्हावा."

"महाराज सांगतील त्याप्रमाणंच करावं लागेल."

कान्होजी काहीच बोलले नहीत. दिनकररावांना रात्रीच्या भाजेनाचं आमंत्रण द्यायला ते विसरले नाहीत.

दुसऱ्या दिवशी सकाळीच दिनकरराव निघून गेला. बरोबर पंधरा दिवसांनी गहिनाबाई उंबरठ्यावरचं माप ढकलून आंगऱ्यांच्या वाड्यात आली.

* * *

शरदातली पौर्णिमा अवतरली की सागराचं सौंदर्य पहाण्यात कान्होजी फार रमून जात असंत. उफाळणाऱ्या लाटातली लयबद्धता त्यांना खूप आवडे. त्यावर रचलेली गाणी ते आत्ताही गुणगुणत चांदणी बुरुजावर उभे होते. खाली अतिशय विश्वासू सारंग उभे होते.''

''विठोजी सध्या सागरावरच्या हालचाली कशा आहेत?''

''सरकार काय सांगावं. सगला किनारा त्यांनी घेरलाय.''

''स्पष्ट बोला.''

''वसई, ठाणे, चेऊल, गोवा आहे फिरंग्याकडं. मुंबैला हाईत टोपीकर. जंजिरा मुरुड मधी सिद्दीचं ठाणं हाई. आनी...''

''पुढं सांग.'' कान्होजी हसले.

''वेंगुरले, सावंतवाडीवर, खेमसावंत आनी मालवन आहे. करवीरकरांच्या ताब्यात.''

''म्हणजे सर्व कोकणकिनारा या लोकांनी घेरलाय म्हणायचा!''

''व्हय.''''

''विठोजी आता श्वास घ्यायलाही उसंत नाही. तैयारीतच असणं आवश्यक आहे.''

समोरून हिरोजी आला. मुजरा करून तो उत्तरला.

''सरकार शिवाजी वेळासकरने दोन फतेमाऱ्यांना कोंडले आहे.''

''हिरोजी, विठोजी चला जाऊ या.''

''आत्ता सरकार? ... पहारा बळजोर आहे.''

''असू द्या. ह्याचवेळी जाणं उचित आहे.''

कान्होजींची नांव तिथं पोहोचली. तेव्हा मराठी नाखवे जहाजावर चढत होते. त्यांच्याकडं कौतुकानं पहात त्यांनी विचारलं.

''शिवाजी ह्या फतेमाऱ्या कुणाच्या?''

''टोपीकरांच्या.''

''कुठून आलाय!''

''भायंदर.''

''कुठं चाललात?''

''जंजिरा-मुरुड.''

''आत काय आहे?''

''मीठ.''

''ही इतकी चौकशी चालू असता जहाजाचे कप्तान खाली उतरले. त्यांच्याकडे कान्होजींनी तीव्र कटाक्ष फेकला.

''दस्तक आहे?''

''लाजिएगा.''

''यावर नाव आहे 'हाजी पीर शहाबुदिन!' कुठं आहे?''

''हम हैं'' ... एक तरुण पुढं येऊन बोलला.

''हाजी कासम हाजी कमरुद्दिन कोण?''

''हम हैं'' दुसरा मध्यम वयाचा माणूस पुढं आला.

''या फतेमाऱ्या कुणाच्या?''

''इंग्रजांच्या.''

''खामोश, खोटं बोलू नका. या तुमच्याच आहेत.''

मघाशी शिवाजीला ते फसवू पहात होते. परंतु कान्होजीनी त्यांची लबाडी जाणली असल्यामुळं ते स्तब्धच राहिले. विठोजीच्या हातातले दोरखंड पाहून त्या दोघानांही परिस्थितीची चांगलीच जाण आली.

"माफ कीजिए महाराज. ये गुरवे हमारे है. यह दस्तक झूठ है."

"कसे मिळवले?"

दोघंही चूप झाले. यावेळी न सांगून चालणार नसल्याचं जाणून तो प्रौढ नम्र स्वरात म्हणाला.

"महाराज पचास-सौ रुपये लेकर कंपनी सरकार देती है"

"ठीक है, यांची जहाजं ताब्यात घेऊन यांना अंधार कोठडीत रवाना करा."

"महाऽराजऽऽ"

दोघांनाही घेऊन एक नाव निघाल्याचं पाहून कान्होजी जरा मजेत हसले. जवळच उभ्या असणाऱ्या शिवाजीच्या खांद्यावर त्यानी थोपटलं.

"शाब्बास शिवाजी, तुमच्यासारखे सारंग आमच्यापाशी असल्यावर आम्ही लवकरच कोकणच्या किनाऱ्यावर अधिकार मिळवू."

त्यांच्या उत्तेजक शब्दांनी शिवाजी मोहरून गेला. अधिक काम करून कान्होजींची सत्ता बळकट करण्याचा त्यानं तिथंच निश्चय केला. शिवाजी, विठोजी सारख्या सारंगांना पगार वाढवण्याचं ठरवून ते आपल्या नौकेकडे वळले.

इंग्रज करीत असलेली काळी कृत्यं प्रकाशात आलेली पाहून कंपनी सरकार धास्तावली. विल्यम रेनॉल्डसला त्यानी पाठवलं. त्याच्याबरोबर नारायण शेणवी हा दुभाषी द्यायला कंपनी विसरली नाही. त्या दोघांनी खूप मखलाशी केली. परंतु कान्होजी त्याना बिलकुल बधले नाहीत. त्याच रात्री विल्यम रेनाल्डस आंबट चेहऱ्यानं मुंबईला परतले.

खासे मंडळी खलबतखान्यात आल्याचं समजताच कान्होजी निघाले. दरवाज्यात उभं राहून त्यानी नजर फेकली. बैठकीच्या मध्यभागी त्यांची मसनद होती. वरच्या छतातल्या झुंबरांचा प्रकाश त्यावर पडला होता.त्यामुळं भिंतीवरची इंग्रज पोर्तुगीज चित्रकारांकडून घेतलली चित्रं स्पष्ट दिसत होती. त्यानी आत पाऊल टाकून दरवाजा बंद करण्याचा पहारेकऱ्याला हुकूम दिला. ते येऊन मसनदीवर स्थिरावले. सर्वांकडे समाधानानं पहात. इंग्रज कुरापत काढणार असल्याचा अंदाज व्यक्त केला.

"सरकार, चिंता करू नये, आम्ही आहोत" सर्वांनी एक मुखानं आश्वासन दिलं.

खंडोजी माणकर उभा राहिला. आपल्या कमरेच्या शेल्याला स्पर्श करीत उत्तरला.

"सरकार, त्या दोन्ही फतेमाऱ्यांवर उत्तम सारंग आणि जहाजं बांधणारे आहेत. त्याना आपल्या नोकरीत येण्याची इच्छा आहे."

"बहोत अच्छा, आपल्याला जरुरी आहेच. त्यांना घेऊन तुम्ही आम्हाला भेटा खंडोजी.

"मंडळी आठ दिवसांनी आम्ही महाराजांच्या भेटीस जाणार. त्यांच्या बरोबर कदाचित जेजुरीलाही जाण्याची इच्छा आहे. तुम्ही सर्वांनी एकदिलानं राहून, आमच्या गैरहजेरीत दुष्मनावर लक्ष ठेवा."

"आज्ञा सरकार."

कान्होजी उठले, तेव्हा कोंबड्यानं बांग दिली होती.

कृष्णाजी कान्हो गोविंद, संताजी पालव, हरजी मोरे वगैरे मंडळी कान्होजींबरोबर जाण्यासाठी तयार झाली. यावेळी त्यांच्यासंगे सेखोजी जाणार असल्यामुळं संभाजी आणि मानाजी फार-फार नाराज झाले. कान्होजी देवदर्शन करून येताच तिन्ही राण्यांनी त्या दोघांच्याही कपाळी कुंकू लावून, हातावर दही घातलं. सेखोजीच्या मनात गोंधळ उत्पन्न झाला. आतापर्यंतच्या

अनुभवावरून केलेल्या कल्पनांना थोडासा धक्का बसला. आईसाहेब, लढाईवर जाताना दही देतात. तुम्ही तर आज...
"दादाराजे, तुम्ही महाराजांच्या भेटीला निघालात, त्यात कामयाबी प्राप्त करून यावं म्हणून ते केलंय."
"महाराजांचं दर्शन लढाईपेक्षा बिकट असतं." लक्ष्मीबाई बोलल्या.
मथुराबाई, लक्ष्मीबाई पतीशी बोलत होत्या. परंतु गहिनाबाई मात्र चुपचाप उभी होती. तिच्या कडेवर एक वर्षाचा येसजी होता.कान्होजींनी त्याच्याकडे पहात हसत-हसत विचारलं.
"येसजी तुम्ही येणार का?"
"ते सर्वांत धाकटे, ... ते कसे येतील?"
लक्ष्मीबाईच्या शब्दांतला आशय कान्होजीच्या ध्यानात आला नाही. परंतु गहिनाबाईचं कोमल हृदय व्याकुळ झालं. तिच्या नेत्रात पाणी आलं. आपले अश्रू या शुभवेळेला अयोग्य असल्याचं जाणून, तिनं मान वळवून, डोळे पदरानं पुसले. ढोल नगारे वाजू लागले. कान्होजी निघाले. मार्गातच त्यांना महाराज जेजुरीस गेल्याचं समजताच. त्यांनी वाकडीवाट करून जेजुरी गाठली.
सकाळची कोवळी किरणं खंडोबाच्या मंदिरात खेळत होती. काळ्या पत्थरांना त्यांनी उजळून टाकलं होतं. सर्वत्र उत्साह ओसंडत होता. महाराज देवदर्शनाला येणार असल्यामुळे लोकांची धावपळ सुरू होती.
गोंधळी कवड्याच्या माळा गळ्यात घालून नाचत होते. कान्होजी, महाराजांच्या इंतजारीत खालीच थांबले होते. छत्रपती शाहूमहाराज लवाजम्यासह येऊ लागले. पालखीतून न येता चालत येणाऱ्या महाराजाचं दर्शन घेण्यासाठी आसपासच्या खेड्यातून आलेली रयत मार्गावर दुतर्फा उभी होती. मंदिरात जाण्याच्या पहिल्या पायरीवरच, कान्होजींनी नम्रतेनं त्रिवार मुजरा केला.
"सेनासरखेल. कान्होजी आंग्रे देवाचिये द्वारी आमची-तुमची होणारी भेट अलौकिक आहे. आम्ही बहोत खूष आहोत. ... चला."
दोघंही मंदिराच्या पायऱ्या चढू लागले. अंतिम पायरीवर उभं राहून दिसणारं सौंदर्य दोघांनीही टिपलं. वर आल्यावर पाय धुऊन त्यांनी खंडोबाचं दर्शन घेतलं. महाराजांनी मोत्याचा कंठा अर्पण करून मनोभावे नमस्कार केला. कान्होजींनी आणलेली रेशमी वस्त्रं देवापुढं ठेवली. स्वराज्याचे दोन्ही पाइक प्रदक्षिणा करून मध्यभागी आले.

शाहूमहाराज व कान्होजी आंग्रे यांची जेजुरीस भेट

"हे शिमग्याचे दिवस आहेत, आम्ही कान्होजीसंगे रंग खेळणार आहोत."
महाराजांच्या मुखातून शब्द बाहेर पडताच सेवक पळाले. थोड्याच अवधीत रंग भरलेले रांजण येऊन पोहोचले.
"दोघंही मनसोक्त रंग खेळून ओलेचिंब झाले. मनंही सुखावली. मुक्त हसत ते पायऱ्या उतरू

लागले.''
जेजुरीहून ते साताऱ्यात आले. कान्होजीची उत्तम बडदास्त ठेवण्याचा हुकुम देऊन महाराज जातीनं त्यांची आस्थापूर्वक चौकशी करीत होते. कान्होजी मात्र या स्वागताने लाजले.
''महाराज, मी आपला सेवक. माझी इतकी वास्तपुस्त आपण का करावी?''
''कान्होजी, आम्ही राजे म्हणजे रयतेचे आणि सेवकांचे वालिद आहोत. पिता आपल्या पुत्रावर प्यार करीत नसल्याचा पुरावा तुमच्यापाशी आहे का?''
कान्होजी त्यामुळे अवाक् होऊन पहातच राहिले. छातीवर विसावलेल्या कवड्याच्या माळेला स्पर्श करीत महाराज उत्तरले. ''कान्होजी, आम्ही आमच्या सेवकांना आस्था, प्रेम देतो. म्हणूनच ते या राज्यासाठी स्वत:ची कुर्बानी करतात. थोरले महाराज, आमचे पिताजी आणि काकाजी अस्संच प्रेम करीत आले, म्हणूनच ही सल्तनत आज टिकून आहे.''
''होय महाराज.''
''दुसऱ्या दिवशी रंगपंचमीनिमित्त अदालतखान्यासमोर भव्य शामियाना सजू लागला. रंगीत किनखापी पडदे सोडले. त्याखाली मोत्यांच्या झालरी लावून, मधे-मधे पाचूची फुलं लावली. पडद्यांवर सुवर्णतारांचे मोर आपला रंगीबेरंगी मण्यांचा पिसारा उभारून मोत्यांचा चारा टिपत होते. खाली फरशीवर इराणी गालिचे होते. त्यावर गुलाबी रंगाची बैठक घातली होती. श्वेतरंगाचे तकिये ठेवून त्याची शोभा अधिकच वाढली होती. कान्होजी शामियान्याकडे येऊ लागले. त्यांचे कारकून नजराण्याची तबकं घेऊन त्यांच्या मागून चालत होते. थोड्याच वेळात सोन्याचे गुर्ज घेतलेल्या गुर्जबरदारांच्या घोषणांनी शामियाना नि:स्तब्ध झाला.
''खडी ताजीऽऽम निगाह रख्खो, गोब्राह्मण प्रतिपालक छत्रपती श्री शाहूमहाराज पधार रहे हैंऽऽ सावधाऽऽन'', या ललकाऱ्या शामियान्याच्या भव्यद्वाराशी हळूहळू विराम पावल्या. महाराज धीम्या चालीनं तख्ताकडे वळले. पगड्या, शेले, मंदिल नम्र झाले. महाराज सिंहासनावर स्थिरावले. दोन चवरीदार त्यांच्या मस्तकावर चवऱ्या ढाळू लागले. समोर तरुण पेशवा बाजीराव बसले होते. महाराजांनी त्यांच्याकडं पाहून हलकं स्मित केलं. कान्होजी उभे राहिले. त्यांनी त्रिवार मुजरा करून उंची वस्त्रे, जवाहर आणि परदेशी कारागिराकडून मिळवलेल्या अतिशय सुंदर वस्तू असलेली तबकं महाराजांसमोर ठेवली. छत्रपतींच्या सावळ्या गोल मुद्रेवर समाधानाचं स्मित उजळलं. कान्होजी त्यांच्याकडे एकाग्र नजरेनं पहात राहिले.
महाराजांच्या अंगात पिवळसर रेशमी अंगरखा होता. खाली खुतनीचा चोळणा होता. कमरेला गहिऱ्या गुलाबी रंगाचा शेला होता. त्यांत थोरल्या महाराजांची भवानी तलवार होती. पायात लखनवी जरीचे चढाव होते. गळ्यात खंबायती मोत्यांच्या हाराबरोबर कवड्यांची माला होती. अगदी गळ्याला लागूनच हिऱ्याचं कमळ लखलखत होतं. कानात हिऱ्याचा चौकडा होता. मस्तकावरचे केस खांद्यावर रुळत होते. कपाळी शिवगंध होतं. ओठावर पांढऱ्याशुभ्र मिशा आणि हनुवटीला दाढी होती. त्यांचे गंभीर शब्द शामियान्यात उमटले.
''पेशवा बाजीराव बाळाजीनी, कान्होजीना सेनासरखेलीची वस्त्रे देण्याचा इंतजाम करावा.''
बाजीरावांनी मान झुकवून, आज्ञा अंमलात आणीत असल्याचं दर्शविलं. त्यानी हुजऱ्याला इशारा करताच, सोन्याचं लखलखीत तबक पुढं आलं. महाराजांनी त्याला स्पर्श करताच, मोत्याचा तुरा, रत्नखचित तलवार, अलंकार आणि शिक्का कट्यार असलेलं तबक कान्होजीच्या हाती दिलं. दुसऱ्या सरदारांनाही महाराजांनी वस्त्रं, अलंकार, खिताब देऊन गौरव केला. इतर महत्त्वाचं काम नसल्यामुळं महाराज उठले. रंगानं भरलेले रांजण घेऊन सेवक उपस्थित झाले. दरबारी पोषाख उतरवून मंडळी रंग खेळण्यास उपस्थित झाली. बाजीराव, कान्होजी, महाराज, चिमाजी, ... रंगांची उधळण करू लागले. दुपारी महाराजांच्या पंगतीला

भोजन करून कान्होजी कुलाब्याकडे वळले.

* * *

नगारखान्यात चौघड्यावर टिपरी पडली. तोफांचे बार झाले. कुलाब्यातल्या घराघरात कान्होजींना पुत्ररत्न झाल्याची खबर समजली. कान्होजींच्या खास हत्तीला शृंगारून माहुतानं दिल्लीदरवाज्यात उभा केला. त्याच्यावर साखरेची पोती घेऊन खाजगीतली कारकून मंडळी बसली. बरोबर घोड्यांचं पथकही निघालं. सरदार, सावकार, सरंजामदार आणि प्रतिष्ठित नागरिकांची यादी घेऊन हरिपंत आलेले दिसताच माहुतानं इशारा केला. उंटावर असलेली नौबत वाजू लागली. हत्ती तालबद्ध पावलं टाकीत सोंड हलवीत चालू लागला. वाड्यावर नामकरणाचा सोहळा चालू असतानाच खबरगीर येऊन पोहोचले. हरिपंतांनी त्यांना खुलासेवार विचारून घेतलं. 'हकीगत अत्यंत महत्त्वाची होती. कान्होजींच्या कानावर घालणं अतिशय आवश्यक होतं. परंतु यावेळी त्यांना सांगायचं कसं' हेच त्यांना समजेना. श्रीकृष्णपंतांचा सल्ला घेऊन ते सरकारस्वारीसमोर मुजरा करून उभे राहिले. कान्होजी समजले.

"पंत काही विशेष दिसतंय? पुढच्या महालात जाऊ."

कान्होजींच्या मागून ते चालू लागले. महालात आसनावर बसत त्यांनी विचारलं.

"पंत बोला... आम्ही फार उत्सुक आहोत."

सरकार टोपीकर आणि फिरंगी एक आघाडी करून कुलाब्यावर येत असल्याची खबर आहे. म्हणून यावेळी आपल्याला सांगावं लागलं. ... क्षमा असावी."

"पंत ही गोष्ट तुरंत बाजीरावाला कळवा म्हणजे कबूल केल्याप्रमाणं ते फौजा पाठवतील."

* * *

पौष महिन्यानं शीतलतेच आवरण पसरलं. कडकडीत थंडीत कान्होजींचे लोक कांबळी घेऊन पहाऱ्यावर होते. नारायण, भवानी, बहिरी, मनोरी जहाजं समुद्रात पहारा करू लागली. मधूनमधून कान्होजी आपल्या छबिन्यातून बराच सागरी भाग नजरेखाली घालू लागले. त्या दिवशी अमावस्येचा गच्च कडकडीत काळोख होता. मध्यरात्री पहारेदारांच्या डोळ्यांवर झापड आली. हलक्या गडबडीचा सुगावा लागताच ते खडबडून जागे झाले. किल्ल्याच्या मागच्या दरवाज्यातून टोपीकर आणि फिरंग्यांचे सैनिक आत येण्याचा प्रयत्न करीत होते. पहारेदारांचे बाहू फुरफुरू लागले. परंतु जागा न सोडण्याचा त्यांना हुकुम असल्यामुळे ते चुळबुळत तिथंच स्तब्ध उभे राहिले.

"ओ दरवाजा नही टूटेगा. ... चलो."

हे त्या सैनिकांचे शब्द हवेत विरत असतानाच त्यांनी आपल्या फौजा किल्ल्याच्या सभोवार पसरल्या. कान्होजींची युक्ती सफल झाली. सागरात दूरदूर उभी असलेली जहाजं, गुरबे येऊ लागले. आंगऱ्यांच्या सैन्यानं चौफेर हल्ला चढवला. किनाऱ्यावरच्या पुळणीत चिमाजीअप्पांची फौज होतीच. त्यांनी त्या सैन्याचा धुव्वा उडवला. कान्होजी बहिर्जीला घेऊन हिंडत असताना खंडोजी मानकर धावत अला.

"सरकार घात झाला. टोपीकरांनी तटाला शिड्या लावल्यात अन्..."

"बोला लवकर."

"दिल्ली दरवाज्यालाऽ खिंडार..."

कान्होजींनी वास्तविक परिस्थिती जाणली. यावेळी फौजेत जोश निर्माण करणं आवश्यक

असल्याचं जाणून त्यांनी बुलंद स्वरात गर्जना केली.

"आमच्या सैनिकांनो ... मेल्या आयचं दूध प्याला नसाल तर तुटून पडा. हरहर महादेवऽऽ."

ही पोलादी घोषणा ऐकताच कान्होजीच्या फौजा त्वरेनं पुढं गेल्या. पाचशे-सहाशे इंग्रजांनी कुलाब्याला रक्तानं भिजवून टाकलं. परंतु आरमारी काही कमी नव्हते. त्यांनी टोल्यास-प्रतिटोला देऊन त्यांना पराजित केलं. कर्नल ब्रेथवेटची मान शरमेनं झुकली. त्यांचा नक्षा खाड्कन् उतरला. त्यानं नारायण शेणवीला कान्होजीकडे तहासाठी पाठवलं.

कान्होजी, चिमाजीसमवेत बोलत बसले होते. द्वारावरच्या पहरेदारानं खबर देताच कान्होजींनी अनमुतीचा इशारा केला. मध्यम वयाचा, सुदृढ शरीराचा तेजस्वी मनुष्य आत आला. लखलखणारं तबक कान्होजींसमोर ठेवून त्यानं मुजरा केला. परदेशी वस्त्रं आणि हिरे-मोती, रंगीत मणी पाहून ते उत्तरले.

"तुमच्या साहेबानं पाठवलेला नजराणा आम्हाला खूप आवडला."

"महाराज, कंपनी सरकार त्याबद्दल आभारी आहे."

"ठीक ... तुमचं काय म्हणणं आहे?"

"मी कंपनीतर्फे तहासाठी उभा आहे."

त्यांनी मुद्दामच खोचक प्रश्न विचारला होता, परंतु त्यांच्या अपेक्षेप्रमाणं उत्तर मिळालं नाही. त्यांनी चिमाजीअप्पाकडं अपेक्षेनं पाहिलं. नजरेत नजर मिसळली. दोन्ही मनांचा विचार एकरूप झाला.

"नारायणराव, कंपनीच्या केवळ प्रतिनिधीशी तह करण्याची आमची इच्छा नाही. सेनापती येणं आवश्यक आहे."

"महाराज आपण सामान्य कलमं मला सांगा. मी ती सेनापतीला कळवितो. नंतर ते येतील."

"प्रथम तुम्ही आमच्या वाटेस येणार नसल्याचं कबूल करावं. ... मगच आम्ही त्याबद्दल बोलू."

"पोर्तुगीज व्हाइसराय आणि कंपनी सरकारला आम्ही कळवतो."

"त्याबरोबर हेही सांगा की 'तह श्रीमंत बाजीराव पेशवे आल्यावरच होईल.'..."

त्याला वस्त्रं आणि निरोपाचे विडे देऊन नंतर कान्होजी चिमाजीअप्पासमवेत उठून चालू लागले.

* * *

मथुराबाई, लक्ष्मीबाई आणि गहिनाबाई जवाहिऱ्याकडून हिऱ्या-माणकांची खरेदी करीत होत्या. खासगीकडून आलेले कान्होजी एवढी खरेदी पाहून चकितच झाले.

"कुणाच्या लग्नाची खरेदी चाललीय?"

"आपल्या लाडूबाईंच्या." मथुराबाईंनी हसंत हसंतच उत्तर दिलं.

"इतकी मोठी झाली?"

"धावं लागलं."

"तुमचं कितव्या वर्साला झालं?"

"आमची गोष्ट नको. लेकीचं लगीन योग्य समयी झालं पायजे."

"कुठं जमवलंत की काय?"

"तुम्हांला पसंत असेल तर निश्चित करायचं."

"चालेल."

धाकट्या बाईंच्या नात्यातले ते आहेत."

"सविस्तर सांगा."

“ते मोरे आहेत मालवणचे.”
“ठीक आहे. ... आम्ही उद्याच पंतांना पाठवतो.”
लाडूबाईंचा विवाह थाटात पार पडला. यावेळी क्रमवंत त्रिंबक जोशी, लक्ष्मण जोशी यांनाच पौरोहित्य देऊन कोकणस्थांना कान्होजींनी चांगलीच समज दिली. विवाहासाठी जमलेली मंडळी आपापल्या गावी जाताच ते पुन्हा आपल्या कामात गर्क झाले.
इंग्रज, पोर्तुगीज, डच आणि हबशी कान्होजींना भिऊ लागले. त्यांची त्यांना दहशत बसली. कान्होजीचं नाव ऐकून त्यांचे सैनिक थरथरू लागले. त्यामुळं शाहूमहाराजांच्या मनात कान्होजींना विशेष स्थान मिळालं. महाराजांनी खलिता पाठवून त्याचं वारंवार कौतुकही केलं. कान्होजींना खूप आनंद झाला. परंतु घरातल्या दुहीमुळं त्यांच्या खुशीला ग्रहणच लागलं.
सेखोजी त्यांचा प्रथमपुत्र असल्यामुळं, तोच तख्तावर येणार, असा विचार करून सर्व सरदार त्याला मान देऊ लागले. परंतु संभाजी आणि मानाजीना ते पसंत नव्हतं. त्यांच्या मनात त्याच्याबद्दल द्वेष उत्पन्न झाला. ते काहीतरी कुरापती काढून भांडणं उपस्थित करू लागले. हे पाहून आणि ऐकून कान्होजीच्या मनाला बिलकुल चैन नव्हतं. चिंतेनं त्यांच्या मनात घर केलं. ती चिंता त्यांच्या हृदयाला कुरतडू लागली.

* * *

पावसाळा सुरू झाला. काजळी आकाशाचं हृदय फोडून जलधारा खाली येऊ लागल्या. सागराचा रंग बदलला. क्रोधानं लाल होऊन, रोंऽ रोंऽ करीत तो पर्वताच्या उंचीशी स्पर्धा करण्यासाठी उफाळू लागला. या त्याच्या भयानक रूपाकडं पाहून जहाजं थरथरू लागली. समुद्रावरचे आक्रमक चुपचाप बसले. कान्होजींनी आपल्या काही सारंगांना रजा देऊन घरी पाठवलं. पहारा मात्र तसाच ठेवला. कान्होजी स्वत: जातीनं फिरून बुरुजावर चढून टेहळणी केल्याशिवाय दिवसाला मावळू देत नसत.
त्या दिवशी घोड्यावरून दौडत असतानाच त्याना एकदम थकवा वाटू लागला. ते घरी परतले. कुणाशीही न बोलता ते महलात परतले. हुजऱ्यानं येऊन वस्त्र बदलताच, ते मंचकावर पहुडले. ते स्वत:शीच पुटपुटले.
“साठ वर्षं झाली. शरीर आता पहिल्यासारखं साथ देत नाही. जडजोखमीची जबाबदारी पेलताना छातीत धडधडतं, तेव्हा मुलांना त्यांच्या जिम्मेदारीची कल्पना द्यावी हे बरं!” ... त्यांचं एक मन बोललं.
“काय वेडा आहेस का इतक्या लवकर तुझ्या कणखर देहाकडे पहायला यमाला, धीर तरी होईल का” दुसऱ्या मनाचा घोगरा आवाज कानात घुमला.
“आमचं काय संपलं असेल कदाचित! कुणी सांगावं?”
महालाच्या आतल्या दरवाज्यातून आलेल्या मथुराबाईंकडे पाहून ते उगीचच हसले. त्यात नेहमीची मुक्त प्रसन्नता नसून कारुण्य असल्याचं तिला तीव्रतेनं जाणवलं. मंचकाजवळ येऊन तिनं विचारलं.
“तबीयत ठीक नाही का?”
“तसं काही-नाही. थोडासा थकवा आहे इतकंच! मथू, आज सर्वांशी बोलावसं वाटतंय. बोलवतेस कां?”
“हो”
थोड्यात वेळात सहा पुत्र आणि त्यांच्या माता कान्होजींसमोर आल्या. त्यांनी हातानं इशारा करताच समोरच्या मंचकावर बसल्या. त्या सर्वाकडे एकाग्र नेत्रांनी पाहून ते गंभीर स्वरात

बोलले.
''संभाजी-मानाजी, ... हे सेखोजी ... आमचे थोरले पुत्र. आमच्यानंतर परंपरेनुसार ते सरखेल होणार.''
''आबासाहेब, म्हणजे आम्ही त्यांच्यावर चवऱ्या ढाळायच्या?'' संभाजी ताडकन उत्तरला.
''संभू रागावून कसं चालेल? तुम्ही धाकले झालात त्याला काय करायचे?'' असं म्हणून ते हसले.
''आबासाहेब, ... थोरला अन् धाकला करण्यापेक्षा, तुम्ही वाटण्या करून आमचा भाग आम्हास द्यावा.''
पंधरा वर्षांच्या संभाजीचे शब्द. उकळत्या तेलाप्रमाणं त्यांच्या कानात पडले. उभ्या अंगाची संतापानं लाहीलाही झाली, काय बोलावं हेच त्यांना सुचेना. ते बराच वेळ आपल्या पत्नीकडे अपेक्षेनं पहात राहिले. परंतु त्या स्तब्धच होत्या.
''बेटा, हे शिवछत्रपतीचं राज्य आहे. वाटणी करणारे आम्ही कोण?''
''तर मग ते प्राप्त करून घेण्यासाठी आम्हाला टोपीकरांची मदत घ्यावी लागेल.'' मानाजीनं संभाजीकडं पाहिलं.
''मानाजी, तुम्ही काय बोलता? शुद्धीवर आहात ना?'' लक्ष्मीबाई रागानं बोलल्या.
स्वार्थानं अविवेकी झालेल्या या मुलांना बोलण्यात काही अर्थ नाही, हे कान्होजीनी जाणलंच. त्यांना संभाजी-मानाजीचा खूप राग आला. ताड्-ताड् फटके मारून त्यांना हाकलून देण्याची त्यांना जबरदस्त इच्छा झाली.
परंतु असामान्य घरातली असख्याची छिद्रं रस्त्यावर टाकणं इष्ट नसल्याचं जाणून ते शांत-गंभीर तुटलेल्या स्वरात म्हणाले.
''बाळांनो, जुडग्यात असलेल्या काठ्यांची गोष्ट माहीत आहेच. अगदी तस्संच होईल. घरातला एकोपा सोडून शत्रूला घरात घेतलंत की आरमारासह तो तुम्हाला पूर्ण गिळून टाकील.''
कान्होजींच्या डाव्या बगलेत कळ उठली. छातीवर हात ठेवून ते कुशीला वळले. गहिनाबाईनं उठून त्यांना पाणी दिलं. डोक्याखाली उशी देऊन, त्याचं मस्तक सरळ करून, पाय ताठ केले.
''कशाला हव्यात या कटकटी? ही पोरं खरोखरच अवगुणी आहेत.'' या शब्दांना ओठाच्या बाहेर पडू न देता, चुपचाप बसलेल्या आपल्या येसजी, धोंडजीकडे पाहिलं. त्या मुलांचा तिला अभिमान वाटला.
''बोलण्यानं तुम्हांला त्रास होतोय, नंतर सांगा केव्हातरी!''
''गहिना, आजच बोलतो, पुन्हा कदाचित अशी वेळ येणार नाही.''
हे शब्द गहिनाबाईंचे हृदय चिरंत गेले. तिचे नेत्र अश्रूंनी भरले. ते लपविण्यासाठी ती उठून खिडकीकडे गेली. कान्होजींनी कुस बदलली. मुलांवर नजर स्थिर केली ते स्वत:ला सावरीत उत्तरले.
''आमच्या मनाप्रमाणं वागण्यात तुमची भलाई आहे. सेखोजीनं सरखेली आणि कुलाबा संस्थानचा कारभार पहावा.''
''आम्ही काय करावं?'' संभाजीचा उतावळा प्रश्न पुढं आला.
''संभाजी, तुम्ही शूर आहात, तुम्ही दक्षिण कोकणात बाणकोट ते विजयदुर्गापर्यंतचा प्रदेश पहा!''
''मानाजी, स्वमुलखाचं संरक्षण आणि परमुलखी स्वाऱ्यामध्ये मदत करण्याची जिम्मेदारी तुमचेवर. येसजी धोंडजी, शांत चित्तानं काम करणारे आहेत. त्यांनी जमाबंदीची कामं पहावीत.''

पित्याचे शब्द थांबताच संभाजी-मानाजी आपल्या धाकट्या भावांकडे पाहून कुत्सित हसले. गहिनाबाईच्या हृदयात वेदना आरपार गेली. मथुराबाईंना मुलांचा फार राग आला. कान्होजींनी परिस्थितीचा अंदाज घेऊन मुलांची समजूत घालण्याचा इराद्यानं म्हटलं.

"राज्य करताना सर्व बाबींना सारखंच महत्त्व असतं. जमाबंदीचं काम महत्त्वाचं नाही असं समजू नका. आमच्या लेखी सारंग, नाखवा, तोफा बनवणारे कारागीर सारखेच वजन राखून आहेत. सागराकडे पहा. मोत्यापासून लहानग्या चिंबोऱ्यापर्यंत सर्वांनाच त्यानं प्रेमानं आश्रय दिलाय. म्हणूनच त्याला आम्ही महान मानतो. तुम्ही न रुसता न रागावता प्रेमानं राहिलात तर हे सर्व तुमचंच आहे."

"आबासाहेब आम्हाला तुम्ही काहीच सांगितलं नाहीत!"

त्याच्याकडे पहात ते कौतुकानं हसले. तुळाजीच्या विचारीपणाचं "अप्रुप" वाटून लक्ष्मीबाई सुखावल्या.

"तुळाजी, कुलाब्याचा अवाढव्य व्याप एकट्या सेखोजींना झेपणं कठीण असल्यामुळं तुम्ही इथंच थांबावं."

त्यानं मान हलवून पित्याला अनुमती दर्शविली. महालात स्तब्धता पसरली. संभाजी-मानाजी मात्र चुळबुळंत राहिले. बाकी चौघेही शांत होते. तिन्ही पत्नींचे प्राण भयानं गोळा झाले होते.

"मथुराऽऽ थोडं पाणी देऽऽ."

घोटभर पाणी पिऊन त्यांनी डोळे मिटले. बोलण्याचा ताण त्यांना असह्य झाला होता.

"राजवैद्यांना बुलावा धाडायचा का?"

"आम्हाला स्वस्थ पडू द्यावं. थोड्या वेळानं राजवैद्यांना पाठवा."

ते महालात एकटेच राहिले. राजवैद्य आले. त्यांनी भस्ममात्रा दिली आणि पूर्ण विश्रांतीचा सल्ला दिला. या आजारात त्यांचं बळ त्यांना पार सोडून गेलं. मनानं आणि शरीरानं ते फार थकून गेले.

* * *

धो-धो पावसाचा आषाढ महिना संपला. सर्वत्र हिरवळ पसरली. त्याच्यावर पडलेले उन्हाचे कवडसे. आगळं-वेगळं सौंदर्य निर्माण करू लागले. पांढरी-पिवळी किरणं कळ्यांना हसवू लागली. फुलांचा सुवास दरवळू लागला. माडावर नारळाच्या पेंडी लोंबकळू लागल्या. पोफळीवर हिरवे कंच बेडे दिसू लागले. खवळलेला समुद्र थोडा शांत झाला. परंतु ढग मात्र आकाशात इतस्तत: फिरत होते. मध्येच सूर्याला झाकून झिम्मा खेळत ते पुढं सरकत तेव्हाचं सौंदर्य अवर्णनीय असे. कान्होजी आपल्या पलंगावरून दिसणाऱ्या निसर्गाच्या खेळाकडे एकाग्रतेनं पाहत होते.

श्रीकृष्णपंतांनी येऊन मुजरा केला. आपल्या स्वामींच्या चेहऱ्यावर प्रेमळ नेत्र स्थिरावत त्यांनी विचारलं.

"सरकार कशी आहे प्रकृती?"

"ठीक आहे. परंतु आता फारसा भरोसा वाटत नाही."

"असं बोलू नये. आत्तापर्यंत दोघं बरोबर राहिलो. आणि आता..." पंतांचा स्वर ओला झाला.

"पंत लहानपणी तुमच्याशिवाय आम्ही कुठं जात नसू. परंतु आता तसं करून चालणार नाही. तुमची आता फार-फार जरुरी आहे. या मुलांचं भवितव्य ठीक दिसत नाही. मानाजी, संभाजी सेखोजीविरुद्ध फिरंग्याशी-टोपीकरांशी हातमिळवणी करतील असं दिसतंय. पंत अशावेळी खंबीरपणानं उभा रहाणारा दुसरा कोण?"

"बोलण्यानं त्यांना खूप कष्ट झाले. त्यांनी नेत्र मिटले. छातीवर डाव्या हातानं दाबून कोंडलेला श्वास बाहेर सोडला. हळूहळू डोळे उघडून त्यांनी सभोवार नजर फेकली. महालात निस्तब्ध शांतता होती. सागराचा गंभीर ध्वनी महालाच्या भिंतीवर आदळत होता. पंत सचिंत चेहऱ्यानं उभे होते. त्यांच्याकडे हसून पाहत त्यांनी विचारलं.

"पंत ... हा महिना कोणता?"

"श्रावण."

"तिथी कोणती?"

"शुद्ध सप्तमी."

"ठीक आहे. तुम्ही जावं. आम्हाला एकांताची फार जरुरी आहे."

"पंतांचा पाय तिथून निघेनाच. परंतु हुक्माप्रमाणं जाणं आवश्यक असल्यामुळे पुन्हा एकवार जिवलग मित्राकडे पाहून ते निघाले. मथुराबाई आत आली. कान्होजींचे ओठ हलत होते. डोळे मिटलेले हाते. मथुराबाईंची नजर पतीच्या मुखावर होती. हळूहळू चेहरा तारठला. रंग पालटून त्यावर निस्तेज कळा पसरली. तिच्या मनात अशुभ शंका आली. तिनं पतीच्या पायाला स्पर्श केला. त्या थंडगार शरीराची तिला पूर्ण कल्पना आली. ती मान घालून अश्रू ढाळू लागली. चंद्राला चाहूल लागताच तिनं सर्वांना सांगितलं. लक्ष्मीबाई-गहिनाबाई धावत आल्या. पतीच्या निष्प्राण देहाकडे पाहून लक्ष्मीबाईंना दु:खाचा कढ आवरला नाही.

"नेहमीप्रमाणं डाव अर्धाच टाकून गेलात ना?"

गहिनाबाईंनं मथुराबाईला मिठीच घातली. ती हमसून-हमसून रडत बोलली.

"बाई शेवटची भेटही झाली नाही. मी तर फार अभागी आहे."

"आपण तिघीही... दुर्दैवीच आहोत."

त्यांच्या अश्रूंच्या वर्षावानं कान्होजींचा देह भिजत होता. परंतु त्यातून सजीवतेला अंकुर फुटत नव्हते. जंजिरा कुलाब्यावर दिमाखानं फडफडणारं आंगऱ्यांचं तांबडं निशाण जमिनीवर उतरवलं. मराठी राज्याचा भगवा झेंडा थोडा खाली आला. किल्ल्यात भयानक शांतता पसरली. सरखेलीची वस्त्रं आणि अलंकार घातलेला कान्होजींचा निष्प्राण देह पुढच्या छज्जात ठेवून भगवी ढाल तलवार जवळ ठेवली. त्यांच्या दर्शनासाठी रयतेची रीघ लागली. पंत आत आले. डोळे पुसत त्यांनी मथुराबाईंना विचारलं.

"राणीसाहेब, आपलं दु:ख मी जाणतो. परंतु मसनद निर्णायकी ठेवता येत नाही. सेखोजींना सरखेलीच्या तख्तावर बसविल्याशिवाय पुढचं काहीच करता येत नाही."

"योग्य असेल ते करा. पंत आम्हांस काहीच सुचत नाही."

सेखोजी कान्होजींच्या मसनदीला प्रणाम करून पदस्पर्श न करता त्यावर बसले. त्यांच्या नावाचा जयघोष झाल्यावर लोक कान्होजींकडे वळले. लाखो लोकांचा पोशिंदा सरखेल 'कान्होजी आंगऱ्यांची शवयात्रा निघाली. रयतेनं फुलं उधळून आपली श्रद्धा प्रकट केली. किनाऱ्यालगत असलेल्या स्मशानात प्रचंड जनसमुदाय उभा राहिला. चंदनाच्या चितेवर त्यांचं शव ठेवलं. चिता पेटली. ज्वाला उफाळल्या. सेखोजींनी नेत्रांतील अश्रू पुसले. चितेला नमस्कार करून त्यांनी समाधी बांधण्याचा हुकुम दिला. उचंबळणाऱ्या सागराच्या लाटा थांबल्या. निश्वास सोडून त्यांनी श्रद्धा व्यक्त केली. कोकणातल्या 'दर्याच्या-राजा'ला डोळाभर पाहून तो पुन्हा स्वत:त गर्क झाला.'

**